शिक्षणखात्याचा मंजुरी-क्रमांक:
मराठी-पापुसं/३२८५/बाभाम/१५४६४-स-२४-स-
दिनांक २० मार्च १९८५.

मराठी

# बालभारती

इयत्ता सहावी



१९८५

महाराष्ट्र राज्य
पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ
पुणे

प्रथमावृत्ती : १९८५

प्रकाशक : श. वा. वेलणकर
नियंत्रक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,
मुंबई-400 018

कागद : ६१ × ८६ सेमी. ६० जी. एस. एम क्रीम वोव्ह.
या पुस्तकाचा कागद महाराष्ट्र राज्य शिक्षणखात्याने सवलतीच्या दरात उपलब्ध करून दिला आहे.

टाईप व फोटोसेटिंग : १६ पॉ. साधा. मे. केसन सर्विसेस, २६, भोमानजी लेन, फोर्ट, मुंबई-400 001.

मुद्रक : महेंद्र. एम्. पटेल, प्रताप लिथो वर्क्स, १०८ भोसरी पुणे 411026

मुद्रणादेश क्र : P.O.T.B. No.: 3801/18-5-85 (1.00)

## प्रतिज्ञा

" भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने
नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्धी ह्यांतच
माझे सौख्य
सामावले
आहे. "

# प्रस्तावना

'बालभारती' च्या नव्या वाचनमालेतील हे इयत्ता सहावीचे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद होत आहे.

सहावीचे हे पुस्तक इयत्ता पाचवीच्या 'बालभारती' शी मिळते-जुळते व्हावे असा एक विशेष प्रयत्न यात केला आहे. हे पुस्तक शक्यतो निर्दोष व्हावे या हेतूने या पुस्तकाच्या चाचणी प्रती अनुभवी शिक्षक, शिक्षणतज्ज्ञ, प्रशिक्षण संस्था इत्यादींच्याकडे पाठवून त्यांचे अभिप्राय घेण्यात आले. त्यांनी केलेल्या सूचनांच्या संदर्भात मंडळाच्या मराठी-भाषा-समितीने आवश्यक ते संस्कार करून हे पुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व अद्ययावत करण्याचा प्रयत्न केला आहे. आस्थापूर्वक घेतलेल्या परिश्रमांबद्दल मंडळ समितीचे आभारी आहे. तसेच अगत्याने अभिप्राय पाठवून ज्यांनी ज्यांनी या पुस्तकाच्या संपादनास हातभार लावला, त्यांचेही मंडळ आभारी आहे.

या पुस्तकाचे अध्ययन-अध्यापन प्रभावी होण्याच्या दृष्टीने या पुस्तकाची शिक्षकांसाठी हस्तपुस्तिका उपलब्ध करून देण्याची योजना विचाराधीन आहे. मंडळाच्या या नव्या उपक्रमाचे शिक्षकमित्र स्वागत करतील अशी अपेक्षा आहे.

पुणे:
दि. १ मे १९८५
वैशाख ११, १९०७

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ

# अनुक्रमणिका





# १ सानेगुरुजी

## राजा मंगळवेढेकर

वसंत नारायण मंगळवेढेकर (जन्म: १९२५) कवी, कथाकार, चरित्रकार, बाल व किशोर वाङ्मयाचे लेखक. मुलांना परिणामकारक गोष्टी सांगणारे निवेदक. 'सानेगुरुजींची जीवनगाथा', 'लोकनायक जयप्रकाश' इत्यादी चरित्रे, 'आपला भारत' ही भारतातील राज्यांची माहिती करून देणारी पुस्तकमाला यांचे लेखक.

सानेगुरुजी हे ज्ञानेश्वरांनंतर माउलीचे पद मिळवणारे दुसरे संस्कृतीचे मराठी लेखक. दीनदलितांसाठी सानेगुरुजी आमरण धडपड करत राहिले. 'तुकाराम आदी संतांच्या मालिकेत मी त्यांची गणना करीन', असे विनोबा त्यांच्याबद्दल म्हणाले. मुलांबद्दल गुरुजींना विशेष उमाळा होता. त्यांचा ओझरता परिचय या लेखात करून दिला आहे.

**लहानग्या** श्यामने एकदा गुलबाक्षीच्या कळ्या तोडून आणल्या. ते पाहून श्यामची आई त्याला म्हणाली, "श्याम, अरे अशा मुक्या कळ्या तोडू नयेत. झाड म्हणजे फुलांची आईच. तिच्या मांडीवरच कळ्या चांगल्या फुलतात."

संध्याकाळी श्याम खेळून आला की पुन्हा अंघोळ करी. आई त्याच्यासाठी पाणी तापवून ठेवत असे. एका संध्याकाळी श्याम कपडे काढून नेहमीप्रमाणे अंगणातल्या धोंडीवर अंघोळीसाठी जाऊन बसला. आईने त्याचे अंग खसखसा चोळून त्याला अंघोळ घातली. त्याचे अंग पुसले. तशी श्याम तिला



म्हणाला, ''माझे पायाचे तळवे ओले आहेत, त्यांना घाण लागेल. तुझे ओचे धोंडीवर पसर. त्यांवर मी पाय ठेवीन.'' श्यामचा हा हट्ट आईने पुरवला अन् ती त्याला म्हणाली, ''श्याम, पायाला घाण लागू नये म्हणून जपतोस, तसाच मनाला घाण लागू नये म्हणून जप हो.''

अशा लहानसहान प्रसंगांतून आईने श्यामला शिकवण दिली, चांगले वळण लावले. म्हणूनच सानेगुरुजी नेहमी म्हणत, 'आई माझा गुरू, आई कल्पतरू!'

अमळनेरच्या शाळेत गुरुजी काही वर्षे शिक्षक होते. तिथल्या वसतिगृहाचे ते प्रमुखही होते. मुलांना शिकवताना आणि सांभाळताना ते मातेच्या ममतेने त्यांचे सारे काही करत. वसतिगृहातल्या मुलांचे खाणे-पिणे, दुखणे-खुपणे, अभ्यास, खेळ अशा सर्वच गोष्टींकडे त्यांचे बारीक लक्ष असे. मुलांची सेवा-शुश्रूषा करताना तर त्यांना मोठा आनंद वाटे.

वर्गाच्या चार भिंतींत मिळणारे शिक्षण त्यांना पुरेसे वाटत नव्हते. त्या भिंतींच्या बाहेर जी विशाल, सुंदर, विविधतेने नटलेली सृष्टी आहे, तिची ते विद्यार्थ्यांना ओळख करून देत.

शाळेचे वसतिगृह पडीक जमिनीत होते. तिच्यात मोठमोठी काटेरी झाडे-झुडपे वाढली होती. तिथे सुंदर बाग फुलवण्याचे गुरुजींनी ठरवले. विद्यार्थीही त्या कामाला सरसावले. काटेरी झाडे-झुडपे तोडण्यात आली, जमीन खणून वाफे तयार करण्यात आले. रोपे लावण्यात आली. विहिरीचे पाणी शेंदून, वाहून आणून त्यांना घातले जाऊ लागले.

एका सकाळी एका गुलाबावर कळी दिसू लागली. दुपारी अर्धी उमलली, सायंकाळी संपूर्ण विकसली. गुरुजींसह सर्व मुले बागेत जमली. स्वच्छ चांदणे पडले होते. त्या गुलाबाच्या ताटव्यावर निरनिराळ्या रंगीत वस्त्रांचा साज चढवला होता. त्या वस्त्रांतून गुलाबाचे ते गोंडस फूल बाहेर डोकावत होते. त्याचा जन्मोत्सव अशा रीतीने साजरा करून गुरुजी मुलांना म्हणाले, ''तुम्हीही या फुलासारखेच आहात. स्वतः तर आनंदी राहाच, पण आपल्या आनंदात इतरांनाही भागीदार करा.''

गुरुजींनी शाळेत केवळ पाठ्यपुस्तकातलाच इतिहास शिकवला नाही; तर स्वातंत्र्यासाठी घडत असलेल्या इतिहासाचाही त्यांनी मुलांना परिचय करून दिला.

**स्वातंत्र्याचे आम्ही शिपाई**
**सुखवू प्रियतम भारतमाई**
**मंगल मंगल त्रिवार मंगल**
**पावन दिन हा धन्य अहो**
**भारत प्यारा स्वतंत्र झाला**
**जय बोला, जय बोला हो!**

अशी सुंदर स्वातंत्र्यगीते रचून त्यांनी ती मुलांना शिकवली.ती गाणी म्हणत ते मुलांबरोबर आनंदाने नाचलेदेखील.

पावसात मुलांबरोबर आनंदाने भिजताना 'प्रभूचे लक्षावधी हात सृष्टीला कुरवाळायला येत आहेत,' असे पावसाचे वर्णन गुरुजींनी केले होते. ही रसिकता व सौंदर्यदृष्टी त्यांच्या ठायी होती, म्हणूनच तिचा अनुभव त्यांचे साहित्य वाचताना पदोपदी येतो. त्यांनी अनेक सुंदर गोष्टी कुठून कुठून चिमणीप्रमाणे आणल्या आणि आपल्या साहित्याद्वारे मुलांना दिल्या.

लहानपणापासून गुरुजींना चिमणी फार आवडे.

**चिमणी येऊन**
**नाचून बागडून**
**काय म्हणे मला,**
**'चिवचिव करीन**
**चिंता हरीन**
**हस रे, माझ्या मुला!'**

या ओळींत गुरुजींनी चिमणीचे मुलांवरील आणि मुलांचे चिमणीवरील प्रेम सुंदर रीतीने वर्णन केले आहे.

स्वातंत्र्यलढ्यात भाग घेण्यासाठी एकोणीसशे तीस साली गुरुजींनी शाळेचा निरोप घेतला. व्यक्तिगत जीवनाचा विचार त्यांनी बाजूला सारला. त्यांच्याबरोबर काही विद्यार्थ्यांनीही स्वातंत्र्यलढ्यात उडी घेतली. ते तुरुंगात गेले, त्यांनी

देहदंड सोसला. असे हे थोर शिक्षक! ते इतिहास उत्तम प्रकारे शिकवत होतेच; पण इतिहास घडवतही होते.

गुरुजींनी जे जे लिहिले, सांगितले आणि केले, ते ते सारे अंतरीच्या उमाळ्याने. हा उत्कट उमाळा, जिव्हाळा त्यांच्या अंतःकरणात ओतप्रोत भरलेला होता. म्हणूनच गुरुजी आपले मोठेपण विसरून मुलांमध्ये रमले. मुलांनाही ते आपलेच वाटत.

मुलेच हे जग सुंदर बनवतील आणि ते प्रेमाने भरून टाकतील असा त्यांचा गाढ विश्वास होता. आपल्या बागेतील झाडापेडांवर प्रेम करणाऱ्या कुशल माळ्याप्रमाणे बालमनाची फुलबाग त्यांनी फुलवली. मुलांना त्यांनी गोड गोष्टी सांगितल्या, त्यांच्यासाठी गाणी रचली, नाटके लिहिली. 'सुंदर पत्रे' या पुस्तकात त्यांनी निसर्गाचे किती सुंदर वर्णन केले आहे! माणसाने माणसावर तर प्रेम करावेच; पण शिवाय मानवेतर सृष्टीचीही ओळख करून घेऊन तिच्यावर प्रेम करावे, अशी त्यांची शिकवण होती.

गुरुजी नेहमी म्हणत–हातचं राखून काम करणं मला जमत नाही. म्हणूनच थोर कार्यासाठी प्रसंगी ते आपला प्राणही पणाला लावत. धुळ्याच्या गिरणीकामगारांची उपासमार टाळण्यासाठी आणि पंढरपूरचे विठ्ठलमंदिर अस्पृश्य समजल्या जाणाऱ्यांना खुले करण्यासाठी त्यांनी आपल्या प्राणाचीही पर्वा केली नाही.

श्रमप्रतिष्ठेवर गुरुजींनी सतत भर दिला आहे. श्रमांची महती गाताना ते म्हणतात –

'एक हात भू नांगरणे
शत व्याख्यानांहून थोर
एक हात खादी विणणे
मंत्रजपाहून ते थोर.'

गुरुजींची सारी धडपड समाजसेवेसाठी चालली होती. ते म्हणत, 'हात सेवेसाठी राबत असावेत, ओठ एखादं गोड गाणं गुणगुणत असावेत आणि सर्वांविषयीच्या प्रेमानं हृदय सदैव भरलेलं असावं. ह्या माझ्या तीन भुका आहेत. त्या शमवता आल्या, की मी आनंदी राहीन.'



एके ठिकाणी गुरुजींनी म्हटले आहे, 'मी जीवनाचा एक नम्र उपासक आहे. सभोवतालचा सारा संसार सुखी नि समृद्ध व्हावा, ज्ञान-विज्ञान-संपन्न नि कलामय व्हावा हीच एक मला तळमळ आहे. माझं लिहिणं वा बोलणं, माझे विचार वा माझी कृती हे सारं या एकाच ध्येयासाठी असतं.'

अखेरच्या दिवसांत गुरुजींना राष्ट्रीय एकात्मतेचा ध्यासच लागला होता. जात, धर्म, वंश, भाषा असा कोणताही भेदभाव कोणाच्याही मनात नसावा, सारा समाज हे कुटुंब बनावे ही त्यांची तळमळ होती. त्यासाठी 'आंतरभारती'ची चळवळ उभारण्याची त्यांची तीव्र इच्छा होती. त्याच एका ध्येयाने ते झपाटले होते.

एकोणीसशे पन्नास साली सानेगुरुजी आपल्याला सोडून गेले. त्यांच्या आठवणी, त्यांचे साहित्य आणि विचार यांचा अमोल ठेवा आपल्याजवळ सतत राहील.

## शब्दार्थ व टिपा:

**शेंदणे**– हाताने दोरी ओढून विहिरीतून किंवा आडातून पाणी काढणे. **त्रिवार**–तीन वेळा. **पदोपदी** –पावलागणिक. **उमाळा**–तीव्र इच्छा; प्रेमाचा कढ. **झपाटणे**–एखाद्या गोष्टीने भारावून जाणे, एखाद्या गोष्टीचा ध्यास लागणे.

**हातचे राखून काम करणे**–चुकारपणा करणे. **प्राण पणाला लावणे**–ध्येयासाठी मृत्यू पत्करण्याचीही तयारी ठेवून पराकाष्ठेचा प्रयत्न करणे.

**कल्पतरू**–इच्छित वस्तू देणारे झाड असते, ही कल्पना आपल्या समाजात रूढ असून कल्पवृक्ष, कल्पद्रुम अशा इतर नावांनीही त्याचा उल्लेख आढळतो.

**आंतरभारती**–भारतातील वेगवेगळ्या भाषांचा व त्यांतील साहित्याचा विविध प्रांतांतील लोकांना परिचय करून द्यावा, या हेतूने साने गुरुजींनी या संस्थेची स्थापना केली.

## प्रश्न:

१. 'मुक्या कळ्या तोडू नयेत,' असे आई का सांगते?
२. 'मनाला घाण लागू नये म्हणून जप,' असे आई कोणत्या प्रसंगी म्हणाली?
३. 'आई माझा गुरू,' असे सानेगुरुजी का म्हणतात?
४. वर्गातील शिक्षणाशिवाय इतर कोणकोणत्या मार्गांनी सानेगुरुजींनी मुलांना शिकवले?
५. फुलाच्या जन्माचा उत्सव साजरा करताना मुलांनी काय काय केले?
६. गुरुजींना कोणत्या तीन भुका होत्या?

## स्वाध्याय व उपक्रम:

१. साज चढवणे, पदोपदी, हातचे राखून काम करणे, प्राण पणाला लावणे यांचा वाक्यात उपयोग करा.
२. श्यामची आई, गोड गोष्टी, मृगाजिन इत्यादी पुस्तके मिळवून वाचा.
३. तुमच्या आवडत्या पक्ष्याचे चित्र व माहिती मिळवा.
४. सुटीत जवळपास सहली काढा. तेथील निसर्गाची वेगवेगळ्या ऋतूंतील वैशिष्ट्ये शोधा आणि त्यांची नोंद करा.
५. सानेगुरुजींची 'आम्ही देवाचे मजूर, आम्ही देशाचे मजूर, कष्ट करु भरपूर' ही कविता मिळवा, पाठ करा व सामुदायिक रीतीने म्हणा.

* * *



# २ अंगणातील पाहुणे

## मधु मंगेश कर्णिक

**मधु मंगेश कर्णिक** (जन्म: १९३३) प्रसिद्ध कथालेखक. कोकणातील माणसे व त्यांचे जीवन यांचे दर्शन त्यांच्या कथांतून घडते. 'सोबत', 'झुंबर', 'देवकेळ,' 'गुंजा' इत्यादी कथासंग्रह. 'देवकी', 'भाकरी आणि फूल' इत्यादी कादंबऱ्या.

लेखकाच्या जुन्या कौलारू घरासमोरच्या अंगणात सुतारपक्षी, पिंगळा, माकडे, चानी इत्यादी पक्षी व प्राणी येतात. त्यांच्याकडे पाहताना लेखकाला त्यांच्याबद्दल इतकी आपुलकी वाटू लागते, की ते सारे आपले पाहुणेच आहेत अशी त्याची भावना होते. त्यांच्या सहवासाचे वर्णन या पाठात लेखकाने केले आहे.

**कोकणातील** आमच्या घराला सुरेख, छोटेखानी अंगण आहे. अंगणात तुळशीवृंदावन आहे. संध्याकाळ झाली, की आमची आई त्या तुळशीवृंदावनाच्या कट्ट्यावर बसायची. तिची लहान नातवंडं अंगणात खेळाय-बागडायची. त्यांच्याबरोबर काही सौंगडी असत. मोती कुत्रा त्यांतलाच एक. शिवाय नाम्या बोका व मनी भाटी पिलांसह लोळायची. तुळशीच्या मागं झेंडू, झिनिया, सदाफुली यांची बाग सदाच फुललेली असे. कितीतरी फुलपाखरं इकडंतिकडं भिरभिरताना दिसत. यांखेरीज अंगणात इतरही कितीतरी पाहुणे येत. त्यांचा रहिवास कडेच्या झाडापेडांवर असायचा. दारातल्या फणसाच्या फांदीवर एक पिंगळा नेहमी बसलेला असे.

लिंबोणीच्या खालच्या डहाळीवर निळ्या चंडोलाची एक जोडी बसलेली दिसे. पाठीमागच्या सागवानावर उंच जागी बसून शेपटी वरखाली करत सतत गाणारे दयाळपक्षी आणि आंब्या-फणसांवर चढउतार करत एकसारखी पळणारी चानी दिसे. रस्त्याजवळच्या जांभळीवर ढोलीत अंडी घालणारी पोपटीण नि त्याच ढोलीपाशी बसून टोक टोक आवाज करणारा सुतार हेही नेहमी हजेरी

लावत. आंब्या-फणसांच्या दिवसांत लाल तोंडाची माकडं न चुकता येत. हे सारे आमच्या अंगणातले नेहमीचे पाहुणे! त्यांच्या संगतीत माझा बालपणचा काळ मोठा सुखाचा गेला.

बालपण सरलं. कोकणातलं जुनं कौलारू घरही तेवढंच दुरावलं. आता कोकणात पूर्वीसारख्या वरचेवर खेपा होत नाहीत. पण अलीकडं काही निमित्तानं तिथं बरेच दिवस मुक्काम करावा लागला. रिकाम्या वेळी अंगणात बसलो, की जुन्या आठवणींना उजाळा मिळत असे.

आताचं आमचं घर नवं असलं तरी ते पूर्वीच्याच जागेत उभं आहे. घरासमोरचं तुळशीवृंदावन आणि अंगण पूर्वी होतं तसंच आहे. मागं कोकणात आलेल्या चक्रीवादळात खूपशी झाडं उन्मळून पडली. पण घराजवळची फणसाची, आंब्याची झाडं, आईच्या हातची लिंबीण आणि जांभळी, शिवाय



सागवान ही झाडं अजून शाबूत आहेत. कित्येक वर्षांपासून ती आमच्या घराला सोबत करत आहेत. सकाळी आणि संध्याकाळी आमच्या अंगणात सावल्यांची दाटी झालेली असते. दुपारच्या वेळीच काय ते ऊन येतं. चांदणंदेखील खूप उशिरा आमच्या अंगणात पाऊल टाकतं. त्यासाठी चंद्र माथ्यावर यावा लागतो.

कोकणातल्या माझ्या या वेळच्या मुक्कामात कोणते जुने पाहुणे पुन्हा भेटतात, ते कुतूहलानं पाहू लागलो. आता पूर्वीसारखी फुलझाडं उरली नसल्यानं स्वैरपणं बागडणारी फुलपाखरं दिसत नव्हती. पण पक्ष्यांचा चिवचिवाट मात्र कानी येत होता. त्यांपैकी तीन पाहुणे तर मला नियमानं भेटत होते. जणू पूर्वीची कैक वर्षांची ओळख अद्यापि ते विसरले नव्हते! घराच्या पश्चिमेला भेंड्याचं एक मोठं झाड आहे. त्या झाडाचं वैशिष्ट्य म्हणजे त्याला सदोदित हिरवी पानं लगडलेली असतात. त्या गच्च पर्णराशीत एका सकाळीच तो पिंगळा मला आढळला. बाजूच्या फांदीवर तो निमूट बसला होता. त्याला पाहताच मला खूप आनंद झाला. पिंगळा मोठा नीटस आणि सुबक दिसत होता. मांजरीच्या पिलाच्या कानांसारखे चिमुकले कान त्याला होते. एखाद्या जनावरासारखं त्याचं डोकं दिसत होतं. उचकी लागल्यावर आपली मान मागंपुढं होते, तशी तो आपली मान अधूनमधून मागंपुढं हालवत होता. मान हालवण्याची अशीच



सवय नदीकाठच्या खंड्याला असते. भेंड्याच्या हिरव्या पानांमध्ये त्याचा करडा पिवळा रंग उठून दिसत होता. पिसं खवल्यांसारखी दिसत होती. आपले आखूड शेपूट तो अधूनमधून वरखाली करत तिरक्या मानेनं आजूबाजूला पाहत होता. त्याच्या गोल पिंगट डोळ्यांतील चीर अशा वेळी लहान-मोठी होत होती.

जरा वेळानं त्याला कसलीतरी चाहूल लागली. तो भुर्रकन उडाला नि आंधळ्यासारखा धडपडत पलीकडच्या झाडांमध्ये दिसेनासा झाला. त्याचं उडणं अगदी बेढब आणि बोजड होतं. त्याला दिवसा चांगलं दिसत नाही म्हणतात.



तुळशीच्या कट्ट्यावर बसलो असताना आणखी एक पाहुणी अंगणात यायची. शेजारच्या फणसाच्या झाडावर कुठंतरी इतका वेळ ती धावपळ करत होती. तिथं कंटाळा आला की सरसर खाली उतरून ती अंगणात यायची आणि अगदी माझ्या पायांशी निर्भयपणे हिंडूफिरू लागायची. मी लहानपणी पाहिलेली तीच ती खार असेल का? का तिची लेक, का नात असावी? तीच लहानखुरी तलम करडी पाठ. त्या पाठीवरचे तेच तीन पांढरे पट्टे. तीच वीतभर शेपटी. ती फुलवण्याची, उभारण्याची तीच ऐट नि तीच धावपळ. आम्ही तिला 'चानी' म्हणायचो. अशा पाचसात तरी चान्या रोज अंगणात यायच्या.

भुईमुगाच्या मूठभर शेंगा अंगणात टाकून मी तुळशीपाशी बसत असे. चान्यांना त्याचा पत्ता कसा काय लागे कुणास ठाऊक! भर्रकन त्या खाली येत.

दोन पायांवर बसून एकेक शेंग फोडू लागत. साऱ्या शेंगांचा फन्ना उडवून त्या पळ काढायच्या. घांदल झाली तर तोंडात शेंग घेऊनच पळून जात. त्यांच्यामुळं अंगण नेहमी भरलेलं आणि खेळतं-नाचतं दिसे.

या खेपेला अंगणात भारद्वाजही मला दिसला. घर नेहमी बंद आणि परड्यात नसणारा माणसांचा वावर यामुळं बहुधा किडेमुंग्या टिपायला यायची त्याला सवय जडली असावी. एरवी भारद्वाज घरठाणात आलेला आढळणार नाही. गावाबाहेर रानातल्या एखादया सागवानाच्या उंच फांदीवर बसून हा पक्षी सूर्याच्या दिशेनं तोंड करी आणि उंच स्वरात घनगंभीर साद घाली. कोकणात आम्ही त्याला 'कुकुडकोंबा' म्हणतो. तो कितीही उंचावर बसलेला असला तरी जरा खुट्ट झालं, की झुडपात दिसेनासा होतो. उड्या मारत चालण्याची त्याची ढब दुसऱ्या पक्ष्यांत आढळत नाही. लपतछपत, फांद्याफांद्यांतून वर चढत झाडाचा शेंडा गाठण्याची त्याची ही मुलखावेगळी तऱ्हा बाकीच्या पक्ष्यांत दिसत नाही.



कोकणातील माझा मुक्काम संपत आला. त्या माझ्या लाडक्या पाहुण्यांपासून दूर जाण्याचा दिवस येऊन ठेपला. त्या पाहुण्यांना त्याची काय कल्पना असणार! रोजच्यासारखी एक घिटुकली चानी अंगणात बागडून जात होती. पिंगळा रोजच्याप्रमाणं डहाळीवर बसला होता आणि कुकुडकोंबा परड्यात इकडंतिकडं उड्या मारत होता.

उद्या मी इथून गेलो तरी माझ्यामागं माझ्या बंद घराच्या अंगणात हे माझे जुने सोबती येऊन खेळतील. घराच्या परड्यात हिंडतील, फिरतील, गातील आणि मी पुन्हा कधी परत येतो याची ते वाट पाहत राहतील का?

**शब्दार्थ व टिपा:**

**ढोली**–पक्षी घर करू शकेल अशी झाडातील पोकळी. **चानी**–खार. **चक्रीवादळ**–गरगरत येणारा तुफान वारा. **पर्णराशी**–झाडांची दाट पाने. **ढब**–रीत; तऱ्हा.

**हजेरी लावणे**–न चुकता येणे. **आठवणींना उजाळा देणे**–पुन्हा आठवणे. **फन्ना उडवणे**–संपवून टाकणे.

**प्रश्न**

१. लेखकाच्या अंगणात कोणते सौंगडी येत?
२. अंगणातील घराला कोणाकोणाची सोबत होती?
३. लेखकाला भेटणारे तीन पाहुणे कोणते? त्यांची वैशिष्ट्ये सांगा.
४. कोकणातील मुक्काम संपवताना लेखकाच्या मनात कोणते विचार आले?

**स्वाध्याय व उपक्रम:**

१. तुमच्या परिसरात कोणकोणते पक्षी आढळतात? त्यांची चित्रे जमवा व त्यांची अधिक माहिती मिळवा.
२. आठवणींना उजाळा देणे, उन्मळून पडणे, खुट्ट होणे, फन्ना उडवणे यांचा वाक्यात उपयोग करून वाक्ये वहीत लिहा.
३. 'कितीतरी' या शब्दात 'किती' आणि 'तरी' हे शब्द जोडून लिहिले आहेत. यासारखे 'तरी' हा शब्द जोडून आणखी कोणते शब्द लिहायचे असतात, ते शोधा.
४. 'बोका' या शब्दाचे स्त्रीलिंगी रूप 'भाटी' असे होईल. खालील शब्दांची स्त्रीलिंगी रूपे लिहा.
   उंट, मोर, खोंड, बोकड, राघू.

* * *



# ३ खेळखंडोबा

## शंकर पाटील

**शंकर बाबाजी पाटील** (जन्म: १९२६) कथालेखक आणि चित्रपटकथालेखक. ग्रामीण जीवनाच्या विविध अंगांचे दर्शन त्यांच्या कथांतून घडते. 'वळीव', 'आभाळ', 'भेटीगाठी', 'ऊन', 'धिंड,' इत्यादी कथासंग्रह. ग्रामजीवनाचे चित्र रेखाटणारी त्यांची 'टारफुला' ही कादंबरी प्रसिद्ध आहे. 'वावटळ', 'भोळीभाबडी', 'पिंजरा', 'डोंगरची मैना', 'लक्ष्मी' इत्यादी मराठी चित्रपटांच्या कथा, पटकथा व संवाद त्यांनी लिहिले आहेत.

तालुक्याच्या कचेरीतून गाढवांची शिरगणती करायचा आदेश आला; पण गावच्या पाटलांनी गाढवांच्याऐवजी वानरांची शिरगणती केली! हा घोटाळा का व कसा झाला आणि वानरांची शिरगणती करताना काय काय गोंधळ उडाला, ते या कथेत वाचा.

**सकाळच्या** वेळी सगळेच चावडीवर हजर होते. तोंडात पानाचा तोबरा भरून पाटील तक्क्याला टेकून आरामशीर बसले होते. गावचे सरपंच विभुतेअण्णा चांगलं आलकटपालकट बसून कुणाबरोबर तरी वाद घालत होते. पुढ्यात डेस्क घेऊन बसलेले तलाठी अधनंमधनं फुणगी टाकत होते आणि सरपंचांना ताव चढत होता.

विभुतेअण्णांची गिरणी सुरू झाली होती. तोंडाचा पट्टा जोरात वाजत होता. दळणांची गर्दी व्हावी तशी माणसं चावडीत गोळा झाली होती आणि अशात टपाल आलं. एकाएकी गिरणी बंद झाली. सगळ्यांच्या माना लखोट्याकडं वळल्या. दोन्ही हातांच्या बेळक्यात मान टेकवून बसलेले पाटीलही नजर रोखून बघत राहिले.

तलाठ्यानं लखोटा खालवर तपासला. एका बाजूनं त्याचं तोंड फोडलं. बोटांच्या चिमटीत आतल्या कागदाचं एक टोक धरून बेतानं खलिता बाहेर काढला. तो पिवळा कागद नाकासमोर धरला. नजर वरून खाली खाली सरकत



चालली आणि एकाएकी त्यांना हसू फुटलं. तसं दोघाचौघांनी 'काय ते? काय ते?' असं म्हणत उगाचच खो! खो! केलं. पाटीलही गचके दिल्यागत करून म्हणाले, "काय हो! काय आलंय?"

आपलं हसू आवरून तलाठी म्हणाले, "शिरगणतीचं काम आलं हो!"

पाटलांनी विचारलं, "अहो, परवा तर झाली न्हवं ती?"

तलाठी म्हणाले, "परवा माणसांची झाली!"

"मग आता कशाची आलीय?"

"आता विचारलंय–गावात वांडू किती हैत?"

हे ऐकून सगळ्या चावडीलाच हसू फुटलं आणि बंद पडलेली विभुतेअण्णांची गिरणी पुन्हा सुरू झाली. चाकांवर पट्टा चढला.

"काय हो, अशी कशी शिरगंती करायची?"

डोळे झाकून तलाठ्यांनी थोडं मनन केलं आणि मग झाकलेले डोळे उघडून ते म्हणाले, "असं करू या – आज दवंडी देऊ गावात." असं म्हणून तलाठ्यांनी आपली आखणी सांगितली, "उद्या सकाळी पाक सारं गाव गोळा करू. चारशे तरी माणूस गोळा होईल. शंभर शंभराचा एकेक पुट्टा करू आणि चार पुट्टे चार दिशेला सोडू. पूर्व-पश्चिम-दक्षिण-उत्तर. कसं?"

दिवस मावळून कडुसं पडलं आणि दवंडी द्यायला तराळ गावातनं फिरू लागला. नाक्यानाक्यांवर उभा राहून, त्यानं सादवायला सुरवात केली, "ऐका हो ऐका, उदया सकाळी, दिवस उगवायला, आपल्या गावशिवंतली वांड्रांची मोजणी हुणार हाय. तरी समस्त गावकऱ्यांनी, आपापली भाकरी बांधून येरवाळी, चावडीवर यावं. वांड्र मोजायला सगळ्यांनी जायाचं हाय होऽऽऽ"

अशी दवंडी फिरली आणि गाव सगळं हसत राहिलं. ही कसली मोजणी काढली, काही कळेना झालं! दिवस उगवायला एखादया जत्रेला जावं तशी माणसं चावडीवर येऊ लागली. ही गर्दी झाली! चारशे तिथं पाचशे माणसं जमा झाली. चावडीपुढचं पटांगण नुसतं फुलून गेलं. ही संधी साधून तलाठ्यांनी एक भाषणच ठोकलं. चारी दिशांनी कसं जायचं, शीव कशी गाठायची हे सगळं सांगून झालं. शे-सव्वाशे माणसांचा एकेक पुट्टा तयार झाला. त्यांचे नायक ठरले आणि चार पुट्ट्यांची तोंडं चारी दिशेला वळली! शिरगणतीला आरंभ झाला आणि पाटील-तलाठी देखरेखीवर सुटले.

एकेक मैलाच्या रांगा पुढं पुढं जाऊ लागल्या आणि त्यांची चाहूल लागून वानरं पुढंपुढंच पळू लागली. चाल करून सैन्य जावं, तशा तुकड्या निघाल्या. वानरसेनाही टणाणा उड्या मारत पुढं जाऊ लागली. माणसं जमिनीवरनं पळत होती आणि वानरं एका झाडावरनं दुसऱ्या झाडावर उड्या टाकत होती. ती वरनं निघाली, माणसं खालनं चालली. मोजणार कशी?

दुपारची भाकरी खायची वेळ भरत आली, तरी वानरं काही मोजायला सापडेना झाली. आली का पंचाईत! सगळा घोळ होऊन बसला.

तिकडं हा घोळ झाला आणि पूर्व-पश्चिम-दक्षिण-उत्तर माणसं पुढं चाललेली बघून पाटील-तलाठी आनंदानं चावडीत येऊन बसले. अशात खबर विचारायला विभुतेअण्णा चावडीत उगवले. दोघांनाही आराम बसलेलं बघून लांबनंच त्यांनी विचारलं, "काय म्हणती शिरगंती?"

तोंडावरचा घाम पुसून पाटील बोलले, "झकास चाललीया!"

तोवर कुठलीतरी एक दिशा पळत आली. वानरं यावीत तशी माणसंच उड्या टाकत येताना दिसली. ती लांब आहेत तोवरच पाटील म्हणाले,

''काय गडबडीनं आली गा माणसं!''

तलाठी बोलले, ''पूर्व आली जणू पूर्व!''

बघता बघता पहिली तुकडी येऊन चावडीवर धडकली. पाटील आनंदानं म्हणाले, ''शाब्बास भाद्दरांनो! अशी कामगिरी करावी. आणा आकडा हिकडं.''

तुकडीचा नायक आकडा न देता तोंडाकडंच बघत राहिला आणि डोक्याची टोपी काढून घाम पुसत बोलला, ''कशाचा आकडा!''

पाटलांच्या तोंडावरची टवटवी पार मावळली आणि खालच्या पट्टीत त्यांनी विचारलं, ''का, काय झालं?''

''सगळं उलटं झालं, पाटील!'' असं म्हणून त्यानं सांगायला सुरवात केली. ''वांडृ लई बेरकी! ती काय मोजायला गावत्यात? आमी जसं मागनं जाऊ तशी ती फुडंच पळाय लागली. माणसाला ऐकत्यात?''

हे ऐकून पाटील-तलाठी दोघेही विचार करत राहिले. तोवर पश्चिम आली. पश्चिम येऊन उभी राहिली नाही, तोवर दक्षिण आली; आणि अजून उत्तर कशी आली नाही, म्हणेतोवर उत्तर येऊन हजर झाली. सगळ्यांचा अनुभव एकच.

आता काय करायचं?

रात्रीतनं नवी योजना आखली. आदल्या दिवशी माणसं पळून दमली होती. आता कसली हौसच राहिली नव्हती. चारशे तिथं अवघी दोनशे माणसं कशीबशी हजर झाली. पन्नास पन्नासच्या चार तुकड्या तयार केल्या आणि गावाकडनं शिवेकडं न जाता शिवेकडून गावाकडं यायचा घाट घातला. रांग धरून शीव कशी गाठायची आणि येताना कसं पसरून यायचं हे सविस्तर समजावून सांगितलं. या नव्या योजनेत वानरांना शिवेबाहेर पळून जायला वाव नव्हता. पळून पळून कुठं जातील? गावातच येतील! शिवाय रात्रीतनं गोळा करता येतील तेवढे सायकलीचे पंप जमवले होते. वाण्याच्या दुकानातनं चार रंगांचे चार डबे आणले होते. रिकाम्या बादल्या आणि ते डबे प्रत्येक तुकडीच्या स्वाधीन केले. वाटेत विहिरी होत्याच. मोजदाद करण्यात काही घोटाळा होऊ नये म्हणून ही खबरदारी घेतली होती. वानर मोजलं की त्यावर रंगाची पिचकारी

मारायची! चारी तुकड्यांना चार रंग वाटून दिले होते. ज्या रंगाची वानरं जास्त दिसून येतील त्या रंगावरून त्या तुकडीची बहादुरी कळणार होती. अशी सारी जय्यत तयारी झाली. चार दिशेनं चार तुकड्या सुटल्या.

दुपार झाली. पाटील-तलाठी वाट बघत बसले होते. एवढ्यात चावडीवरचं छप्पर दणाणलं! कुठनं काय पडलं म्हणून सनदी पटांगणात धावत गेले आणि वर चावडीकडं बघत एकजण म्हणाला, "अगं आय आय आय!"

घाबरून पाटलांनी विचारलं, "काय रे, काय?"

सनदी लांबूनच म्हणाला, "वांडरं म्हनायची का काय हो ही!"

वरनं छप्पर सारं हादरत होतं. वर कान आणि बाहेर डोळा देत पाटलांनी विचारलं, "किती आल्यात रं?"

"काय मोजाय येत्यात काय हो!" असं म्हणत शिरगणती सुरू केली...

"एक-दोन-तीन..."

दहा झाले, पंधरा झाले, वीस झाले तरी त्यांचं मोजणं संपेना. ध्यान देऊन सनदी मोजत होता आणि त्याला बेसावध बघून चावडीवरच्या एका वानरानं जी एक खापरी दिली फेकून, ती बरोबर त्याच्या पायाच्या नडगीवर बसली. मोजणी सोडून सनद्यानं पाय हातात धरला आणि तोंडातलं बोलणं बाहेर पडेना झालं.



"लागलं काय रे? लागलं काय रे?" असं म्हणेतोवर सगळी वानरसेना पटांगणात येऊन उभी राहिली. एक का दोन? पाचपंचवीस वानरं! त्यांतले पाचदहा तरी चांगले ढोले होते. बघताना भीती वाटत होती. पिंजऱ्यात वाघ फिरावा तसे ते इकडनं तिकडं अन् तिकडनं इकडं फिरताना दिसू लागले. पाटलांची आणि त्यांतल्या एका वानराची दृष्टभेट झाली. बहाद्दरानं दांडपट्ट्यागत शेपटी हालवली आणि झुपका खालच्या भुईवर आपटून तोंडानं 'हिच्च' केलं. पाटलांना घाम फुटला! तलाठ्यांना तर बोलताच येईना झालं. ते कसेबसे म्हणाले, "काठ्या घ्या. काठ्या!"

कोण काठ्या घेणार? इनमिनतीन सनदी चावडीत राहिले होते. त्यांत एकाच्या पायाची नळी फुटली होती. इकडं अशी तारांबळ उडाली आणि चारी दिशांनी माणसं जवळ येऊ लागली. एकच हलकल्लोळ माजला! कुणाच्या दुकानात शीर, कुणाच्या घरात घूस, कुणाच्या छपरावर उडी ठोक, कुणाच्या पत्र्यावर नाच असं वानरं करू लागली आणि सगळा हैदोस घातला. वानरं अशी घरात शिरू लागली आणि बायका ऊर बडवत बाहेर पडू लागल्या. घड घराचं दारही बंद करता येईना झालं. पुढचं दार लावावं तोवर ती मागच्या दारानं आत शिरू लागली आणि दोन्ही दारं बंद करावीत तर झरोक्यातनं आत येऊ लागली. गावात हा सावळा गोंधळ उडाला आणि चारी अंगांनी चाल करून वानरांना पिटाळत येणाऱ्या पलटणी जोरात येऊ लागल्या. गावात काय गोंधळ चाललाय, वानरांनी काय हैदोस घातलाय याची त्यांना कल्पना नव्हती! त्यांना कसा इशारा द्यावा हे गावात कुणालाच कळत नव्हतं. वानरं परवडली पण माणसं नकोत, अशी पाळी आली होती!

सबंध गावाभोवतीनं माणसांचं कडं पडलं होतं आणि वानरं सगळी गावात घुसली होती. बघावी तिकडं वानरंच वानरं दिसत होती. एक घर त्यांच्या तावडीतनं सुटलं नव्हतं आणि औषधालासुद्धा खापरी शाबूत राहिली नव्हती. घरावरच्या खापऱ्या, अंथरूण पसरावं तशा रस्त्यावर पसरल्या होत्या. परड्यातल्या झाडांच्या फांद्या काडकाड मोडत होत्या. दोन मेढी लावून उभी केलेली छपरं कोसळत होती. पत्रे ढासळत होते.

वानरं मोजायची ते रस्त्यावरच्या खापऱ्या मोजायची पाळी आली. कशाचा रंग, कशाची पिचकारी आणि कशाची शिरगणती! गावात शिरलेली वानरसेना बाहेर कशी हुसकून लावायची हाच घोर सगळ्यांना लागला आणि पाक साऱ्या गावात आरडाओरडा सुरू झाला. गल्लीबोळातनं पलटणी पळू लागल्या. आधी वानरांनी गाव झोडपलं होतं. आता माणसं धुडगूस घालू लागली. पळापळ सुरू झाली! वानरं गावाबाहेर पडली तरी माणसांचा गोंधळ संपेना झाला.

पाटलांनी शिरगणतीचा रिपोर्ट तयार केला. मनाला येईल तो आकडा त्याच्यात भरला आणि खुशाल लखोटा मामलेदार कचेरीकडं पाठवून दिला. अधिक विचार करायला सवडच नव्हती. गावची साफसफाई करायचं काम मागं राहिलं होतं. चार तिथं आठ रोज झाले तरी घराच्या शाकारण्या चालूच होत्या.अशातच पुन्हा एक लखोटा आला. ही आणि काय बल्ला आली म्हणून तलाठ्यांनी कापऱ्या हातांनी लखोटा फोडला आणि एक हात तोंडाला लावून सगळ्या चावडीला उद्देशून ते म्हणाले, "आता आणि वरनं आलंय,वानरं नकोत, गाढवं कळवा."

'थोः तेच्या!' असं म्हणत पाटलांनी आपल्या कपाळाला हात लावला. तेवढ्यात विभुतेअण्णा म्हणाले, "बघा कारभार! माकडांची शिरगंती झाली आता गाढवांची आली. सोडा फलटणी आणि घाला गोंधूळ!" पाक सारी चावडी पालथी पडून हसू लागली.

पाटील म्हणाले, "आता असं करा, कोणतरी एकजण तालुक्याला जाऊन बघूनच या. वांड्रं का नकोत आणि गाढवं का पायजेत हे जरा खडसून इचारा की!"

काय गोंधळ चाललाय कळत नव्हतं. प्रत्यक्ष उलगडा व्हावा म्हणून गावचे तलाठीच तालुक्याला गेले. मामलेदार कचेरीत जाऊन ते चौकशी करून येणार होते. सगळी चावडी त्यांची वाट बघत बसली होती. तलाठी आले आणि घाईघाईनं चावडीत शिरून खाली न बसता उभं राहूनच म्हणाले, "चांगभलं!"

"काय हो, काय झालं?"

"खोबरं उधळा, खोबरं!" असं म्हणून पुन्हा एकदा गजर केला, "अहो,

काय सांगायचं आन् काय न्हाई! ह्यो सगळा गोंधूळ कशामुळं झाला म्हाईत हाय का? कलेक्टरचं टपाल होतं इंग्रजीत. त्यांनी इचारलं हुतं डाँकी किती? त्यातला 'डी' खाऊन शान्या टायपिस्टनं 'यम' टाकला होता. ह्यो यम भोवला बघा यम! 'डाँकी'चं 'मंकी' झालं! वरनं डाँकीच आलं, पर खाली मंकी झालं आणि सगळा गोंधळ उडाला बघा!'

**शब्दार्थ व टिपा:**

**कडुसं**–सूर्य मावळल्यानंतरचा संधिप्रकाश. **पुट्टा**–गट; तुकडी. **सादवणे**–दवंडी देणे. **येरवाळी**–लवकर. **गावशिव**–गावाची हद्द. **सनदी**–सरकारी शिपाई. **रिपोर्ट**–अहवाल. **बल्ला**–संकट.

**आलकटपालकट बसणे**–दोन्ही पाय दुमडून मांडी घालून बसणे. **ताव चढणे**–जोर चढणे. **फुणगी टाकणे**–वादात भर घालणे.

**शिरगणती (शिरगंती)**–दर दहा वर्षांनी देशातील लोकांची मोजणी आणि पाहणी होते. १९८१ मध्ये नुकतीच तशी मोजणी झाली.

**प्रश्न:**

१. लखोटा वाचल्यावर तलाठ्यांना हसू का फुटले?
२. वानरं मोजण्याची पहिली योजना का फसली?
३. वानरांची मोजणी करण्यासाठी कोणती युक्ती केली?
४. वानरं मोजण्याची केलेली नवी योजना का फसली?
५. वानरांनी गावात येऊन कोणता गोंधळ उडवून दिला?
६. 'वानरं परवडली पण माणसं नकोत,' असे का म्हटले आहे?

**स्वाध्याय व उपक्रम:**

१. टकमका बघणे, ताव चढणे यांचा वाक्यांत उपयोग करा.
२. 'रिपोर्ट' सारखे आपल्या बोलण्यात येणारे आणखी इंग्रजी शब्द शोधा.
३. ही कथा आपल्या मित्रांना किंवा भावंडांना सांगा.
४. गावात मैदानी खेळांचे सामने होणार आहेत. त्यासाठी दवंडी कशी द्याल, ते वर्गापुढे साभिनय करून दाखवा.
५. 'पाक सारी चावडी पालथी पडून हसू लागली,' या वाक्यात 'पाक'चा अर्थ एकूणएक, सर्व असा आहे. याहून वेगळ्या अर्थांनीही हा शब्द वापरतात. ते अर्थ लक्षात घेऊन 'पाक' हा शब्द असलेली वाक्ये लिहा.

* * *




# ४ भास्कर राय

ग. प्र. प्रधान

गणेश प्रभाकर प्रधान (जन्म: १९२२) शिक्षणतज्ज्ञ व राजकीय कार्यकर्ते. महाराष्ट्र विधान परिषदेचे माजी सभासद. 'साधना' साप्ताहिकाचे सहसंपादक. 'हाजीपीर', 'सोनार बांगला', 'साता उत्तरांची कहाणी' ही त्यांची पुस्तके. त्यांनी प्रा. अ. के. भागवत यांच्या सहकार्याने लो. टिळक व म. गांधी यांची चरित्रे इंग्रजीत लिहिली आहेत.

१९६५ मध्ये पाकिस्तानने आगळीक केल्याने भारत व पाकिस्तान यांच्या लढाईस तोंड लागले. ही लढाई भारतीय सैनिक शर्थीने लढले. त्यांनी आपल्या पराक्रमाने विजयश्री खेचून आणली. अमेरिकन बनावटीच्या पॅटन रणगाड्यांचा मुकाबला भारतीय जवानांनी अत्यंत धैर्याने केला. या शूर, पराक्रमी योद्ध्यांच्या भेटीसाठी स्वातंत्र्य-सैनिक श्री. शिरुभाऊ लिमये आणि प्रा. ग. प्र. प्रधान हे गेले होते. युद्धाच्या धुमश्चक्रीतही माणुसकीचे जे दर्शन घडते, त्याचे हृदयस्पर्शी चित्र 'हाजीपीर' या पुस्तकात त्यांनी केले आहे. त्यातला हा एक उतारा.

मेजर पुरी आम्हांला म्हणाले, "आता आपण गोडाजारी या गावाजवळ गेलो, की मेजर भास्कर राय आपल्याला भेटतील."

महावीरचक्राचा हा मानकरी आपल्याला भेटणार हे ऐकल्यावर, शाळकरी मुलांचा उत्साह माझ्या अंगात संचारला. धुळीच्या रस्त्यांतून, शेतांतून जीप धावताना असंख्य धक्के बसत होते; पण आता ते लक्षातही येत नव्हते. जीप थांबताच उडी मारून मी खाली उतरलो. मेजर भास्कर राय यांच्याशी हस्तांदोलन करताना 'भालो आछेन?' असं बंगालीत म्हणालो. आश्चर्य वाटून ते म्हणाले, "तुम्ही बंगाली दिसता!"

"नाही, पण तुमच्या भाषेवर माझं मोठं प्रेम आहे."

भास्कर राय यांनी स्नेहानं पुन्हा एकदा माझा हात दाबला आणि मृदू आवाजात ते म्हणाले, "हे शब्द मला फार प्रिय आहेत. दिवसभर लढून,

थकूनभागून कँपकडं मी जेव्हा परतत असे तेव्हा कॅ. चौधरी हा माझा मित्र दुरूनच ओरडून मला विचारी, 'भालो आछेन?'. आज तुम्ही तोच प्रश्न विचारलात आणि ती आठवण येऊन मला एकदम बरं वाटलं."

महावीरचक्र मिळालेला हा वीर सर्वसाधारण लष्करी अधिकाऱ्यांच्या मानानं तसा किरकोळ वाटतो. चष्मा लावणाऱ्या या अधिकाऱ्याला साध्या बिनलष्करी पोशाखात कुणी पाहिलं तर त्यांच्या पराक्रमाची कल्पनाही येणार नाही. मात्र त्यांचं बोलणं ऐकल्यावर थोड्या वेळातच ते किती बुद्धिमान आहेत आणि त्यांची निरीक्षणशक्ती किती सूक्ष्म आहे याची कल्पना येई. छांब-अखनूरच्या लढाईत त्यांनी काय काय केलं, ते मला समजून घ्यायचं होतं. पण त्यांच्या विनयशील वृत्तीमुळं लढाईचं वृत्त सांगताना त्यांनी स्वतःचा उल्लेखही कधी केला नाही. आपल्या सहकाऱ्यांबद्दल मात्र ते फार गौरवानं बोलले.

"आम्हांला तुमच्या स्वतःच्या कामगिरीबद्दल काही सांगा," असं मी पुन्हा म्हणालो, तेव्हा चटकन माझं म्हणणं डावलून ते म्हणाले, "कॅ. नायर यांनी किती लाख मोलाची कामगिरी केलीय ते तुम्ही समजून घ्या." कॅ.नायर जवळच होते. आमच्यातील दुसरा वार्ताहर त्यांच्याशी बातचीत करत होता. ते म्हणाले, "माझं काय घेऊन बसलात! दर्यावसिंगची बहादुरी अपूर्व होती!" बराच वेळ आम्ही गप्पा मारत बसलो होतो; पण कुणीच स्वतःबद्दल बोललं नाही. जो तो आपला दुसऱ्याचं गुणगान करी. हा अनुभव मला अगदी नवीन होता. लढताना स्वतःला विसरून जाणाऱ्या या वीरांना स्वतःबद्दल गौरवानं काही बोलण्याची आवश्यकताच नव्हती. इथं विनयाच्या कोंदणात शौर्य खुलत होतं!

मेजर भास्कर राय यांनी छांबच्या रणक्षेत्रावरील आपल्या अनेक डावपेचांचं वर्णन केलं. विजयानं बेहोष होऊन पुढं घुसणाऱ्या पाकिस्तानी रणगाड्यांसमोर हातबाँब घेऊन जिवाची पर्वा न करता धावणारे जवान कसे बेभान झाले होते, हे विलक्षण धैर्याचे व पराक्रमाचे प्रसंग तर त्यांनी सांगितलेच; पण बुरेजालजवळची ती रात्र किती भीषण होती आणि आपलं एकेक ठाणं खाली करताना शरमेनं अंतःकरण कसं विदीर्ण होत होतं, हेही त्यांनी सांगितलं.

शत्रूच्या डावपेचांबद्दल बोलताना ते म्हणाले, "तिन्ही बाजूंनी दबाव

आणून आम्हांला कोंडीत पकडण्याचा त्यांनी घाट घातला होता. संख्येनं ते आमच्यापेक्षा कितीतरी पट अधिक होते. त्यांचे पॅटन रणगाडे तर जवळजवळ अभेद्यच वाटत होते. त्यांच्याशी मुकाबला करायचा तर थोडी माघार घेणं भाग होतं. त्यासाठी पाठीमागं तर सरकायचं होतं; पण शत्रूला पाठ दाखवायची नव्हती. शत्रूच्या हल्ल्याला तोंड देत देत आमच्यापैकी जास्तीत जास्त जवानांना जवळच्या टेकडीवर पोचायचं होतं. तिथं लढाईची दुसरी अवस्था सुरू झाली. पाकिस्तानी सैन्याला वाटत होतं, की जोरिअनपर्यंत हटलेली भारतीय सेना आता अखनूरपर्यंत पिटाळणं फारसं कठीण नाही. पण त्यांच्या त्या आत्मविश्वासाला आम्ही जबर तडाखा दिला. मधेच एखादया ठिकाणी क्वचित आमची फळी फुटतही असे. पण पुढं घुसलेल्या पाकसेनेला आम्ही लागलीच घेरून टाकत असू. कितीतरी वेळा आम्हांला नामोहरम करण्याचा त्यांनी जिद्दीनं प्रयत्न केला. अखेर त्यांना हटणं भाग पडलं आणि अखनूरचा पूल त्यांच्या नजरेतही येऊ शकला नाही. पंचाहत्तर पॅटन रणगाडे आणि दोन ब्रिगेड सैन्य यांना माझ्या बहाद्दर सहकाऱ्यांनी पुरेपूर धूळ चारली!''

मेजर भास्कर राय पुढं म्हणाले, ''आमची शस्त्रसामग्री त्यांच्यापेक्षा कितीतरी कमी होती; पण जेवढी होती तिचा आम्ही पुरेपूर उपयोग करून घेतला. आमच्या एका रणगाड्याचं इंजिन निकामी झालं होतं. तो टाकून न देता आम्ही एका मोक्याच्या जागी उभा केला आणि पुढंमागं हालचाल न करताही शत्रूवर तुफान भडिमार केला. न हालणारा रणगाडा हा युद्धात एक थट्टेची बाब होऊ शकेल; पण अशा रणगाड्यावर चढून या तरुण दोस्तांनी आपली कामगिरी अगदी चोख बजावली!''

भास्कर राय पुढं म्हणाले, ''हुबेहूब वर्णन करायला मी काही कुणी लेखक नाही आणि कितीही शब्द जुळवले तरी जे सांगायचं आहे त्याचा दहावा हिस्साही मला सांगता येणार नाही. तुम्हांला इथल्या रणकंदनाची नुसती ओझरती कल्पना आली तरी पुरे.''

आम्ही असे खूप वेळ बोलत बसलो होतो. मधेच ते म्हणाले, ''युद्ध अमानुष आहे हे तर खरंच; परंतु माणुसकीचा अपूर्व अनुभवही युद्धातच येतो,

हे त्याहूनही खरं.'' असं म्हणून त्यांनी एक अनुभव सांगितला. ऐन रणधुमाळीत ते एका टँकमध्ये होते आणि त्यांच्या शेजारी दुसरे एक अधिकारी होते. पाच तासपर्यंत ते दोघे बरोबर होते. नंतर त्यांचा तो सहकारी भयंकर जखमी झाला आणि क्षणात गतप्राण होऊन पडला! या प्रसंगाच्या अनुरोधानं राय म्हणाले, ''त्याला तसा कोसळताना पाहून क्षणभर माझं डोकं अगदी बधिर होऊन गेलं. पण थांबायला वेळ होताच कुठं? शत्रूला मागं रेटण्यासाठी आम्ही अविश्रांत झगडत होतो. प्रत्येक क्षण अगदी लाखमोलाचा होता. तो चालवत असलेली तोफ बंद राहून भागलं नसतं. मी लागलीच दुसऱ्या एका अधिकाऱ्याला त्याच्या जागेवर येण्याचा हुकूम दिला. तो अधिकारी वर चढून आला, पण त्याला रणगाड्यात बसता यावं यासाठी माझ्या मित्राचं प्रेत रणगाड्यामधून बाहेर फेकणं



आवश्यक होतं. ते प्रेत आम्ही दोघांनी क्षणाचाही विलंब न लावता ओढून बाहेर काढलं आणि तिथंच उघड्यावर फेकून दिलं. नवा अधिकारी त्या जागेवर बसला आणि बंद पडलेली तोफ पुन्हा धडाडू लागली. अश्रू ढाळायला किंवा सुस्कारा टाकायलाही वेळ नव्हता. शत्रूवर हल्ला चढवायचा आहे इतकंच काय ते समजत होतं. काळीज जणू फत्तराचं बनलं होतं; पण कँपमध्ये परत आल्यावर कपडे उतरताना मात्र मनावरची ती धुंदी पार उतरली आणि सुन्न होऊन मी मटकन खाली बसलो!''

यानंतर क्षणभर थांबून ते म्हणाले, ''माझा दुसरा अनुभवही असाच विलक्षण आहे. सैन्यात काम करणाऱ्या माणसाला भीती अशी फारशी कधी वाटतच नाही; परंतु युद्धात सैन्याला मदत करण्यासाठी दुसरीही अनेक माणसं



लागतात. पाणी आणणं, स्वयंपाक करणं, अशासारखी अनेक कामं करणाऱ्या लोकांचा लढाईशी तसा प्रत्यक्ष संबंध नसतो. अशाच एका तरुण मित्राची ही गोष्ट.

''आपण बसलो आहोत ना,तिथून अर्ध्या एक मैलावर त्या वेळी धुमश्चक्री चालली होती. वर आकाशात विमानांची घरघर एकसारखी चालू होती. त्या तशा धुमाळीत मला क्षणाचीही उसंत नव्हती. कशाचं भान नव्हतं. इतक्यात माझ्या रणगाड्याजवळ एकाएकी आमची एक जीप येऊन थांबली आणि नंदनसिंग पटकन जीपमधून खाली उतरला. त्याला तसा समोर उभा पाहून मला तर आश्चर्याचा धक्काच बसला. मी गोंधळून जाऊन त्याला विचारलं, 'अरे, तू! इथवर आलास तरी कसा?' पण मला पुढं बोलू न देता पटकन तो म्हणाला, 'साब, आप बहुत थक गये हैं। पहले कॉफी लो, फिर बात करो।'



''नंदनसिंग, तो वेडा, तशा त्या आगीच्या वर्षावात आपला जीव धोक्यात घालून माझ्यासाठी गरम कॉफी आणि काही खायला घेऊन आला होता. त्या वेळी ती कॉफी पिताना काय वाटलं ते कधीच मला शब्दांनी सांगता येणार नाही! लहानपणी कलकत्त्याला मी शाळेत असताना असाच फुटबॉल मॅच खेळून दमून घरी परतलो, की माझी आई गरम गरम खायला तयार करून ठेवून माझी वाट पाहत असायची. त्या वेळी मला तिची एकदम आठवण झाली.''

मेजर भास्कर राय यांचे हे हृदयस्पर्शी अनुभव ऐकताना आमचं भान हरपलं होतं!

**शब्दार्थ व टिपा:**

**अमानुष**–राक्षसी; पाशवी; माणसाला न शोभणारे. **रणकंदन**–रणधुमाळी; धुमश्चक्री; निकराची लढाई. **अविश्रांत**–न थकता.

**अंत:करण विदीर्ण होणे**–अतिशय दु:ख होणे. **घाट घालणे**–बेत योजणे. **पाठ दाखवणे**–घाबरून पळ काढणे. **नामोहरम करणे**–पराभूत करणे. **काळीज फत्तराचे बनणे**– अंत:करणातील दया, माया इ. कोमल भावना नाहीशा होणे.

**मेजर**–लष्करातील एक मोठा हुद्दा. **महावीरचक्र**–महत्त्वपूर्ण कामगिरी बजावल्याबद्दल सैन्यातील अधिकाऱ्यांना भारत सरकारकडून दिले जाणारे मानचिन्ह. **ब्रिगेड**–सुमारे तीन हजार सैनिकांचा एक विभाग. '**भालो आछेन**'–'कसं काय? बरं आहे ना?' अशा अर्थाचे बंगाली वाक्य.

**प्रश्न:**

१. 'भालो आछेन' असे म्हटल्यावर मेजर राय यांना आनंद का वाटला?
२. 'इथं विनयाच्या कोंदणात शौर्य खुलत होतं,' असे का म्हटले आहे?
३. पाकिस्तानी सेनेचे डावपेच कोणते होते? आपल्या सेनेने ते कोणत्या मार्गाने उधळले?
४. आपल्या सेनेचे मनोधैर्य विलक्षण होते, हे कोणत्या प्रसंगावरून दिसून येते?
५. मेजर राय यांना आपल्या आईची आठवण कोणत्या प्रसंगामुळे आली?

**स्वाध्याय व उपक्रम:**

१. 'जो तो आपला दुसऱ्याचे गुणगान करी.' यातील 'आपला' हा शब्द गाळला तरी अर्थात बदल होत नाही. ती एक मराठी भाषेची लकब आहे. अशी आणखी काही वाक्ये तयार करा व ती वहीत लिहून ठेवा.
२. 'सैनिक' या अर्थाचा 'जवान' हाही एक शब्द आहे. याप्रमाणे पुढील शब्दांचे समानार्थी शब्द शोधा व जोड्या लावा.

    रणक्षेत्र, लष्कर, युद्ध, विनय, उसंत.

३. 'विजयाने बेहोष होऊन..... हेही त्यांनी सांगितले.' हे पल्लेदार व लांबलचक वाक्य आहे. आपण जणू भाषण करत आहोत असे समजून खणखणीत आवाजात ते म्हणून दाखवा.
४. प्रा. ग. प्र. प्रधान यांचे 'हाजीपीर' हे पुस्तक मिळवून वाचा.

* * *





# ५ अप्पा पटवर्धन – एक सेवाभावी जीवन

**गोविंद शिंदे**

**गोविंद काशीनाथ शिंदे** (जन्म: १९३०) महाराष्ट्रातील सर्वोदयी कार्यकर्ते. अप्पा पटवर्धनांचे अनेक वर्षांचे सहकारी. रायगड जिल्ह्यात पनवेल येथे कुष्टरोग निवारण्यासाठी चालवल्या जाणाऱ्या 'शांतिवन' प्रकल्पाचे व्यवस्थापक. अखिल भारतीय सानेगुरुजी कथामालेचे सरचिटणीस. वृत्तपत्रीय लेखन.

'कोकणचे गांधी' म्हणून अप्पा पटवर्धन प्रसिद्ध होते. ते स्वातंत्र्याच्या सर्व चळवळींत होते. 'अंत्योदय' हा त्यांच्या चिंतनाचा व प्रयोगांचा विषय होता. रत्नागिरी जिल्ह्यात कणकवलीजवळ गोपुरी आश्रम ते चालवत असत. त्यांच्या जीवनातल्या एका प्रेरक प्रसंगाचे हे चित्रण.

**श्री.** सीताराम पुरुषोत्तम पटवर्धन हे अप्पा पटवर्धन म्हणून सर्वत्र ओळखले जात. ४ नोव्हेंबर १८९४ या दिवशी त्यांचा जन्म झाला. समुद्रालगतच आगरगुळे हे त्यांचे गाव. घरी आंबे, फणस, काजू यांची काही झाडे होती. त्यांची

फळे काढण्याचे काम अप्पा करीत. अप्पांना पोहणे, झाडावर चढणे, मल्लखांब करणे खूप आवडे. आट्यापाट्या, खो-खो, फुटबॉल हे खेळ त्यांना आवडत. गुरावासरांबद्दल त्यांना प्रेम होते. झाडे लावण्याची आवड होती.

शाळेत ते हुशार विद्यार्थी गणले जात. त्यांनी रत्नागिरीला माध्यमिक शिक्षण घेतले. शालान्त परीक्षेनंतर उच्च शिक्षणासाठी ते मुंबईला आले. बी.ए.च्या परीक्षेत ते दुसऱ्या क्रमांकाने उत्तीर्ण झाले. एम.ए.च्या परीक्षेत त्यांना चांगले यश मिळाले.

पुण्याच्या एका महाविद्यालयात त्यांना प्राध्यापक म्हणून नोकरी मिळाली; पण तिच्यात ते फारसे रमले नाहीत. ते खूप वाचन करत. रोजनिशी लिहीत. त्या निमित्ताने अनेक प्रश्न त्यांच्या मनात घोळत असत. त्यांची उत्तरे ते शोधत असत. परदास्याविरुद्ध आपण लढले पाहिजे असे त्यांना वाटत होते; पण आपल्याच माणसांना दास्यात ठेवल्याबद्दलची चीडही त्यांच्या मनात दाटून येई. माणसामाणसांत शिवाशीव का असावी, हा प्रश्न त्यांना बेचैन करी. बायबलमधल्या पुढील वचनाचा त्यांच्या मनावर फार परिणाम झाला होता —

जो आपले दोष जगापुढे उघड मांडतो
त्याच्या दोषांवर जग पांघरूण घालते.
जो आपले दोष जगापासून लपवू पाहतो
त्याचे दोष जग उघडे करते.

आपण आपल्या दोषांकडे निर्भयपणे पाहावे व ते उघड करावे, म्हणजे ते नाहीसे होतील असे त्यांना वाटायचे. आपण आपले दोष लपवले आणि जगाने ते उघडे केले तर त्यात काय शोभा!

महात्मा गांधींशी त्यांची ओळख झाली. त्यांनी आपल्या रत्नागिरी जिल्ह्यातच काम करायचे ठरवले. नोकरी सोडली आणि रत्नागिरीतच विधायक कार्याला त्यांनी वाहून घेतले. मिठाच्या सत्याग्रहात ते सामील झाले. सरकारने त्यांना रत्नागिरीच्या तुरुंगात टाकले.

त्या वेळची ही तुरुंगातली गोष्ट. १९३० सालातली. अनेक सत्याग्रही तुरुंगात होते. ते देशाला स्वातंत्र्य मिळवण्याच्या पवित्र भावनेने तुरुंगात जात.

तिथे आश्रमासारखा दिनक्रम पार पाडण्याचा त्यांचा प्रयत्न असे.

तुरुंगात गेल्यानंतर दुसऱ्या तिसऱ्या दिवशीचा प्रसंग. हौदावर अप्पा अंघोळ करत असताना फाटक्यातुटक्या कपड्यांतला एक कैदी तिथे आला आणि त्यांच्यापाशी पाणी मागू लागला. अप्पांनी पाणी दिले. त्याने आणखी मागितले. आणखी दिले. आपले हातपाय स्वच्छ धुतल्यावर मोठ्या डब्यात तो आणखी पाणी मागू लागला.

अप्पा त्याला म्हणाले, "अरे, हातपाय तर धुतलेस, आता तुला पाणी घ्यायला हरकत नाही. दुसऱ्याला असा त्रास किती द्यायचा?"

तो म्हणाला, "नाही साहेब, आम्हांला हौदाला शिवायची बंदी आहे. तेवढ्यासाठी तुमच्याकडं अशी गयावया करावी लागते."

अप्पांनी त्याला विचारले, "असं म्हणतोस? पण तू कोण?"

तो म्हणाला, "मी कातकरी."

अप्पा म्हणाले, "कातकऱ्यांची शिवाशीव कोणी मानत नाहीत, त्यातून हा तर तुरुंग! इथं सगळेच कैदी. तेव्हा तुला हौदाला शिवायला हरकत नाही."

तो म्हणाला, "आम्ही कुंडीकाम करतो ना!"

अप्पा म्हणाले, "कुंडीकाम म्हणजे?"



तो म्हणाला, "हे तुमचे पिसाब-झाडे उचलून आणतो, संडास धुतो, साफ करतो."

अप्पांनी किंचित थांबून त्याला विचारले, "तुला सजा किती झालीय?"

तो म्हणाला, "तीन वर्ष."

अप्पांनी विचारले, "कशामुळं शिक्षा झाली?"

"चोरी! पोटासाठी चोरी करावी लागली."

यावर अप्पा स्वतःशीच विचार करू लागले—कातकरी स्वतःला वनाचे राजे म्हणवतात आणि पुढला जन्मही कातकऱ्याचाच मिळावा अशी म्हणे देवाची प्रार्थना करतात! मग बिचाऱ्यांवर संडाससफाईची अशी सक्ती काय म्हणून व्हावी?

अप्पा हळहळले. त्यांनी कुंडीकाम मागून घ्यायचे व ते स्वेच्छेने करायचे ठरवले. आणखी इतर बारा सत्याग्रही त्यांच्याबरोबर हे काम करायला तयार झाले. पण नियमावर बोट ठेवून तुरुंगातले अधिकारी त्यांना हे काम करायची परवानगी देईनात. शेवटी अप्पा त्यांना म्हणाले, "अस्पृश्यता हे पाप आहे. इथं तुम्ही कातकऱ्यांना हे काम करायला लावता. ते प्रतिकार करू शकत नाहीत, त्यामुळं ते स्वतःला अस्पृश्य समजू लागतात! आम्ही स्वेच्छेनं हे काम करायला तयार असून ते तुम्ही देत नाही. उलट त्यांचा जन्म एका विशिष्ट जातीत झाला आहे एवढ्यासाठी त्यांच्यावर हे काम लादता, हे मला मान्य नाही. कारण कुणाच्या पोटी आपण जन्म घ्यावा हे आपल्या हाती नसतं. मला याविरुद्ध सत्याग्रह करावा लागेल."

अप्पांनी अशी भूमिका घेतल्याने त्यांना एकांतवासाची शिक्षा देण्यात आली. या सत्याग्रहाची लागण इतर सत्याग्रहींना होऊ नये म्हणून ही उपाययोजना! परंतु अप्पा नमले नाहीत. दाद लावून घेण्याकरिता त्यांनी आठवड्यातून तीन दिवस उपास आरंभला.

अप्पांनी ही सर्व हकीकत गांधीजींना कळवली, तेव्हा गांधीजी म्हणाले, "सत्याग्रह करावा असाच हा महत्त्वाचा प्रश्न आहे!"

१९३२ साली अप्पा दोन वर्षांची सजा भोगण्यासाठी पुन्हा रत्नागिरीच्या

तुरुंगात गेले. त्यांनी कुंडीकामाची पुन्हा मागणी केली. पाच महिने हे काम सत्याग्रहींनी स्वेच्छेने केले; पण तुरुंगाच्या नियमांचा भंग होतो म्हणून अधिकाऱ्यांनी त्यावर नंतर बंदी घातली! मग अप्पा आणि त्यांचे काही सहकारी सत्याग्रही मित्र यांनी अल्पाशन सुरू केले. अल्पाशन म्हणजे कमी अन्न घेणे. बावीस दिवसांत अप्पांचे वजन घटले. त्याच सुमारास येरवड्याला महात्मा गांधीही तुरुंगात होते. त्यांनीही अप्पांच्या सत्याग्रहाला पाठिंबा देण्यासाठी उपवास सुरू केला. नंतर सरकारच्या आश्वासनाने अल्पाशन-सत्याग्रह थांबला; परंतु दोन महिन्यांत सरकारचा प्रत्यक्षात काहीच निर्णय आला नाही. तेव्हा पुन्हा अल्पाशन-सत्याग्रह सुरू झाला. मग चारपाच दिवसांनी कुंडीकामाची परवानगी मिळाली.

अप्पांनी आणि इतर सत्याग्रहींनी कुंडीकाम सुरू केल्यानंतर सफाईच्या कामाची उपकरणे सुधारली. त्यातूनच पुढे 'गोपुरी', 'सोपा' असे संडासाचे नवनवे नमुने तयार झाले.

मृत पशूंचे मांस, हाडे, चरबी हीसुद्धा राष्ट्रीय संपत्ती आहे; पण त्यासंबंधीचे काम जन्माने कोणावर लादणे चुकीचे आहे. राष्ट्रीय जाणिवेने, कर्तव्यभावनेने स्वतः होऊन हे काम केल्यावाचून ही राष्ट्रीय संपत्ती उपयोगी पडणार नाही; म्हणून अप्पा स्वतःच रापी घेऊन मृत पशू सोडवायला उभे राहिले. आपल्या सहकाऱ्यांनाही त्यांनी या कामाची प्रेरणा दिली. मृत पशूंची चरबी, हाडे, मांस यांचाही शास्त्रीय पद्धतीने उपयोग करण्याचे शिक्षण त्यांनी घेतले आणि इतरांना दिले. परंपरागत पद्धतीत सुधारणा केल्यावाचून हा व्यवसाय स्वेच्छेने कोणी करणार नाही, हे त्यांच्या ध्यानी आले होते. लोकशाहीच्या व स्वातंत्र्याच्या मार्गाने जाऊ इच्छिणाऱ्या देशात दुबळ्यांवर कोणतीही गोष्ट लादता कामा नये आणि कुठलेही समाजोपयोगी काम तुच्छ मानू नये, असे अप्पांचे म्हणणे. अप्पांनी स्वतः त्याचे उदाहरण घालून दिले.

अप्पांनी कणकवलीजवळ 'गोपुरी' नावाचा आश्रम काढला आणि हे काम व त्यासंबंधीचे प्रयोग त्यांनी पुढे तसेच चालू ठेवले. नवे आदर्श कसे असावे हे दाखवणारी गोपुरी ही एक प्रयोगशाळाच बनली.

**शब्दार्थ व टिपा:**

**सेवाभावी**–सेवेतच आनंद मानणारा. **विधायक काम**–नवी उभारणी करणारे समाजोपयोगी काम. **दास्य**–गुलामगिरी. **पिसाब-झाडे**–मलमूत्र. **सत्याग्रह**–अन्याय निवारण्याचा शांततामय लढा. **रापी**–जनावरांची कातडी कापण्याचे साधन.

**गयावया करणे**– कळवळून विनवणी करणे. **दाद लागणे**–न्याय मिळणे; दखल घेतली जाणे.

**बायबल**-ख्रिश्चनांचा पवित्र धर्मग्रंथ. **मिठाचा सत्याग्रह**–मिठावरील कर रद्द करण्यासाठी गांधीजींच्या नेतृत्वाखाली १९३० साली दिलेला शांततापूर्ण लढा. **येरवडा**–पुणे महानगरीचा एक विभाग. येथील तुरुंगात गांधीजींना ठेवले होते.

**प्रश्न:**

१. माणसामाणसांत शिवाशीव असावी याबद्दल अप्पांच्या मनात चीड का होती?
२. कोणत्या वचनाचा त्यांच्या मनावर परिणाम झाला?
३. अप्पांनी तुरुंगात कशासाठी सत्याग्रह केला?
४. अप्पांनी कुंडीकाम सुरू केल्यावर सफाईकामात कोणत्या सुधारणा अमलात आणल्या?
५. अप्पांचे जीवन 'सेवाभावी' होते असे का म्हटले आहे?
६. 'मृत पशूंचे मांस, चरबी, हाडे ही राष्ट्राची संपत्ती आहे,' हे लक्षात घेऊन आणखी अशा कोणत्या दुर्लक्षित वस्तूंचा राष्ट्राच्या संपत्तीत समावेश करता येईल, ते सांगा.

**स्वाध्याय व उपक्रम:**

१. 'कुठलेही समाजोपयोगी काम तुच्छ मानू नये,' असे एक सुंदर वाक्य या पाठात आहे. अशा प्रकारची सुवचने शोधा व त्यांच्या पट्ट्या तयार करून वर्गात लावा.
२. गयावया करणे, दाद लागणे, कर्तव्यभावना, स्वेच्छेने, उपकरणे, अल्पाशन यांचा उपयोग करून वाक्ये तयार करा.
३. ग्रामसफाईचा कार्यक्रम आयोजित करा व त्याची हकीकत आपल्या मित्राला पत्ररूपाने कळवा.
४. 'विध्वंसक' हा 'विधायक' या शब्दाच्या विरुद्ध अर्थाचा शब्द आहे. अशा विरुद्ध अर्थी शब्दांच्या आणखी काही जोड्या जुळवा आणि त्या वहीत लिहून ठेवा.

* * *



# ८ मोहीम फत्ते !

**अरुण परुळेकर**

**डॉ. अरुण हरी परुळेकर** (जन्म: १९३८) गोव्यातील 'दोना पावला' येथील 'राष्ट्रीय सागर-संशोधन संस्थे'त काम करणारे वैज्ञानिक. सागरी जीवसंवर्धन आणि खोल समुद्राच्या तळाशी असलेल्या वनस्पती व जीवसृष्टी हे त्यांच्या अभ्यासाचे व संशोधनाचे खास विषय आहेत. शास्त्रीय विषयांवरचे त्यांचे अनेक लेख प्रसिद्ध झाले आहेत.

भारताच्या दक्षिण ध्रुवप्रदेशातील पहिल्या मोहिमेत डॉ. परुळेकर सामील झाले होते. त्या मोहिमेची त्यांनी इथे सांगितलेली हकीकत किती रोमांचकारी व प्रेरक आहे, हे तुमच्या अनुभवास येईल.

**दिनांक** ६ डिसेंबर, १९८१ ची संध्याकाळ. मुरगाव या गोव्याच्या निसर्गरम्य बंदरात 'पोलर सर्कल' नावाचं छोटसं जहाज धक्क्याला लागलं होतं. त्यातून आम्ही दक्षिण ध्रुव प्रदेशाच्या मोहिमेवर जाणार होतो. दक्षिण ध्रुव प्रदेशात भारताची पहिली संशोधन छावणी उभारणं हा आमच्या मोहिमेचा मुख्य उद्देश होता. नाना प्रकारची यंत्रं, उपकरणं आणि साधनसामग्री आमच्या जहाजावर चढवली जात होती.

दक्षिण ध्रुव—आपल्या पृथ्वीचं पार दक्षिणेचं टोक! त्या प्रदेशाला 'अँटार्क्टिका' म्हणतात. तिथल्या सर्वच गोष्टी विलक्षण. पृथ्वीवरचा सर्वांत जास्त वादळी, सर्वांत दुर्गम आणि सर्वांत थंड असा तो प्रदेश आहे.

संध्याकाळचे साडेसात झाले. भोंगा वाजला. लाल रंगाचं आमचं जहाज हळूहळू पुढं पुढं जाऊ लागलं. गोव्याचा रम्य किनारा सोडला. माडांच्या गर्दीतून दिसणाऱ्या सुंदर इमारती मागं मागं सरकू लागल्या.

त्या अथांग पसरलेल्या समुद्राकडं पाहताना गेल्या दोन महिन्यांतल्या आठवणींचा चित्रपट आमच्या डोळ्यांपुढून सरकत होता. दक्षिण ध्रुव प्रदेशाकडं

जायचं तर तीव्र थंडीचा आणि बर्फाच्छादित पर्वतशिखरांवर चढण्याचा अनुभव हवा, पण तो आम्हांला नव्हता. शरीराचे अवयव निकामी करणाऱ्या कमालीच्या झोंबऱ्या हिमवादळापासून कसं संरक्षण करायचं त्याचं तंत्र अवगत नव्हतं. म्हणून आम्हांला काश्मिरला पाठवण्यात आलं. तिथं आम्हांला या सर्व गोष्टींचं शिक्षण देण्यात आलं. मग आमची रवानगी झाली, ती थेट बंगालच्या उपसागरात. तिथल्या एका बोटीवर आम्हांला नाविक जीवनाचे धडे देण्यात आले.

त्या काळातला एक प्रसंग. भारत सरकारच्या महासागर संशोधन विभागाचे प्रमुख डॉ. कासिम हे आमच्या तुकडीचे नेते होते. ते म्हणाले, ''आजारी पडू नये म्हणून आवश्यक ती सर्व खबरदारी तुम्ही घ्यावी; पण त्यातूनही काही बरंवाईट घडलंच तरीही आपली मोहीम पुढं चालू राहील.'' डॉ. कासिम स्पष्ट शब्दांत बोलत होते. ते पुढं म्हणाले, ''प्रवासात आपण कदाचित मार्ग चुकू, बर्फात गोठूनही जाऊ. जहाजाचं इंजिन किंवा इंधनसुद्धा गोठून जाण्याची शक्यता आहे. थोडक्यात सांगायचं तर काहीही घडण्याचा संभव आहे; पण येईल त्या प्रसंगाला आपण धैर्यानं तोंड दिलं पाहिजे.'' हे ऐकून आम्ही म्हटले होतं, ''कोणत्याही संकटाशी मुकाबला करण्याची आमची तयारी आहे.''

आमचं जहाज आता पार समुद्रात शिरलं. पाहावं तिकडं पाणीच पाणी! खाली अथांग सागर आणि वर निळं निळं आकाश! पृथ्वीच्या त्या नव्या खंडाच्या रोखानं आमचं जहाज झेपावू लागलं.

जहाजावर आम्ही एकवीस भारतीय होतो. शिवाय खलाशी, तंत्रज्ञ असे परदेशांतले आणखी पंधराजण होते. आमच्या भाषा वेगवेगळ्या होत्या; पण सर्व मिळून एका कार्याला भिडलो आहोत या जाणिवेनं भाषा, वंश, वर्ण हे सारे भेद पार लोपून गेले होते. जणू आम्ही सारे एकाच कुटुंबाचे घटक झालो होतो!

असेच दहाबारा दिवस लोटले आणि मग पहिल्यांदा जमीन दिसली. हिंदी महासागरातलं ते छोटसं मॉरिशस बेट होतं. तिथं पोचताना आम्ही विषुववृत्त ओलांडलं. ते ओलांडताना आम्ही एक अपूर्व समारंभ साजरा केला. समजूत अशी आहे, की विषुववृत्तावर नेपच्यून या राजाची सत्ता आहे. त्यामुळं

विषुववृत्त पार करणाऱ्या प्रत्येक जहाजावर हे राजेसाहेब आपल्या लवाजम्यासह अवतरतात आणि तिथं आपला दरबार भरवतात. प्रवाशांना ते शिक्षा किंवा बक्षीस देतात. आमच्यापैकी कुणाला उठाबशा काढायची शिक्षा मिळाली, तर कुणाला पायाचे अंगठे धरायची आज्ञा झाली. कुणाला बेडकासारख्या उड्या माराव्या लागल्या, तर कुणाला कडेलोटाची शिक्षा झाली. कडेलोट म्हणजे समुद्रात फक्त बुचकळून काढणं! त्या काल्पनिक दरबारातल्या लुटुपुटीच्या त्या शिक्षांनी आमची खूपच करमणूक झाली.

जहाजावरच्या जीवनाला आम्ही आता चांगलेच सरावलो होतो. आमच्या राहण्याच्या ठिकाणी एकावर एक असे दोन बिछाने असायचे. शिवाय दोन कपाटं, टेबल-खुर्ची, एक सोफासेट असा सरंजामही असायचा. न्हाणीघरात थंड व गरम पाणी नेहमी असे. त्यामुळे अतिशय उष्ण व कमालीच्या थंड अशा दोन्ही सागरपरिसरात आमची मोठी सोय झाली. जेवण पाश्चात्त्य पद्धतीचं असायचं. मधून मधून डाळ-भात, चपाती, परोठे, पापड असे भारतीय पदार्थही केले जायचे. काही हिंदी व इंग्रजी चित्रपट रात्री दाखवले जात. शिवाय अँटार्क्टिकासंबंधीच्या पुस्तकांचं छोटेखानी ग्रंथालयही जहाजावर होतं.

मॉरिशस बेटावर उतरल्या उतरल्या आम्हांला एक वाईट बातमी समजली. आम्ही यायच्या आधी दोनच दिवस पश्चिम जर्मनीच्या अँटार्क्टिका मोहिमेवरील तुकडीला मोठा अपघात झाला होता. हादरून टाकणारी ती बातमी होती! धैर्याची कसोटी पाहण्यासाठी आमचे नेते डॉ. कासिम म्हणाले, ''सांगा, आता कोणकोण अँटार्क्टिकावर जायला तयार आहात?'' आम्ही एकमुखानं उत्तर दिलं, ''आम्हा सर्वांचा निर्धार अभंग आहे!''

समुद्रात आता शेवाळ्यासारख्या वनस्पती दिसू लागल्या. सागरपक्षीही मधूनच दर्शन देऊ लागले. समुद्रात झपाट्यानं सूर मारून ते अन्न शोधत. दुर्बिणीतून पाहताना दूरवर प्रचंड हिमनग तरंगत असलेले आम्हांला दिसून आले.

आमचं जहाज आता चाळिसावा अक्षांश ओलांडणार होतं. त्या अक्षांशावर समुद्रानं रुद्रावतार धारण केलेला असतो, हे आम्हांला माहीत होतं. त्याचा भीषण

अनुभव आम्हांस आला. तुफानासारखा वारा आणि विलक्षण खवळलेला समुद्र! पंधरा पंधरा मीटर उंचीच्या अजस्र लाटा एकापाठोपाठ एक उसळत होत्या. वावटळीत सापडलेल्या पतंगाप्रमाणं आमचं इवलेसं जहाज त्या उन्मत्त सागरावर हिंदोळत होतं.

हा टप्पा आम्ही एकदाचा पार पाडला आणि समुद्र शांत झाला. आता ते प्रचंड हिमनग दृष्टीच्या टप्प्यात आले. हिमनगाचा फक्त एक अष्टमांश भाग पाण्यावर असतो आणि सातअष्टमांश भाग पाण्याखाली असतो. पण आम्हांला दिसणारा हिमनगाचा पाण्यावरचा भागच एवढा प्रचंड होता, की त्याच्या सातपट भाग पाण्याखाली आहे ही कल्पनाच चकित करत होती.

दिवसागणिक तपमान खाली खाली जात होतं. कपड्यांवर कपडे लपेटून घ्यावे लागत होते. एखादा बारीक स्क्रू पक्का करायचा तर त्यासाठी हाताचे मोजे काढावे लागत, पण एवढ्यानंही थंडीची बाधा होण्याची शक्यता असे; कारण तिथली थंडीच अशी विक्रमी! म्हणून अतिशय जपावं लागे.

आता आणखी एक भीषण संकट पाहता पाहता आमच्यावर गुदरलं. अचानक एक विलक्षण हिमवादळ रोरावत आलं आणि त्यानं सर्वांची पार तारांबळ उडवून दिली. आम्ही सर्व हवालदिल झालो. सुरवातीला ताशी वीस किलोमीटर वेगानं आलेल्या त्या वादळानं थोड्याच वेळात ताशी एकशेवीस किलोमीटर वेगाचा प्रचंड टप्पा गाठला. सर्वत्र हिमतुषार थैमान घालू लागले. चारी दिशा दुधाळ होऊन गेल्या. जहाजावरील वस्तू इकडंतिकडं फेकल्या जाऊ लागल्या. आमची त्रेधातिरपीट उडाली. शीर्षासनासह किती आसनं आम्ही केली असतील कोण जाणे! पण हे वादळ जसं अचानक आलं तसं ते अचानकच विसावलं.

आम्ही हिंदी महासागरातून दक्षिण समुद्रात प्रवेश केला होता. जिकडं पाहावं तिकडं बर्फच बर्फ! बर्फ कापणारी यंत्रसामग्री आमच्या जहाजावर होती; पण एका ठिकाणी बर्फ कापता कापता यंत्र टेकीला आलं आणि आमच्या पोटांत भीतीचा गोळा उभा राहिला. मग युक्तिप्रयुक्तीनं जहाज मागं घेऊन पुढं हाकारण्यात आमचे खलाशी यशस्वी झाले. गोठलेलं बर्फ मधूनमधून वितळतं

आणि नद्या वाहू लागतात. आम्ही प्रयत्न करून अशीच एक हिमनदी गाठली आणि मग तिच्यातून आमच्या जहाजाचा पुढील प्रवास सुगम झाला.

अँटार्क्टिकाचा भूप्रदेश आता अगदी नजरेच्या टप्प्यात आला आणि आम्हां सर्वांची मनं आनंदानं भरून गेली. उताराची एक चांगली जागा शोधून जहाजानं नांगर टाकला आणि ९ जानेवारी, १९८२ रोजी आम्ही शिडीवरून दक्षिण ध्रुव प्रदेशात उतरलो.

हिमप्रदेशात पाऊल टाकणं सोपं नसतं. पायाखालच्या बर्फात किती भार सोसण्याची ताकद आहे हे ठरवूनच पुढचं पाऊल उचलावं लागतं. बर्फात अनेक ठिकाणी भेगा पडलेल्या असतात आणि भेगेत एखादी वस्तू गेली तर तिला आपण कायमचेच अंतरतो. अगदी मनुष्यप्राणी जरी त्या भेगेत गेला तरी तो रसातळालाच जायचा. त्यामुळं आम्ही अंदाज घेत अगदी जपून एकेक पाऊल टाकत होतो.

आमचं जहाज नांगरून पडलं होतं, तिथून सुमारे दीड किलोमीटर अंतरावर संशोधन छावणी उभारायचं ठरलं. तिथपर्यंत उपकरणं, अवजारं, निवासभोजनाची सामग्री वाहून नेणं हे काम मोठं बिकट आणि कष्टाचं होतं. आम्ही ते आव्हान स्वीकारलं. आमच्याबरोबर असलेल्या हेलिकॉप्टरच्या व स्नो-स्कूटरच्या मदतीनं आम्ही सर्वांनी हे काम एकजुटीनं व जिद्दीनं पार पाडलं.

आमची छावणी उभारली जाते न जाते तोच कावळ्यांच्या आवाजासारखा आवाज आमच्या कानी पडला. पेंग्विन पक्षी आमच्या स्वागताला व समाचाराला आले होते! किती देखणे दिसत होते ते! त्यांची पाठ काळी आणि पोट पांढरं असतं. पण पक्षी असूनही त्यांना उडता येत नाही. दोन पायांवर उभे असलेले पेंग्विन लांबून पाहिले, की माणसंच उभी आहेत असा भास होतो. हे पक्षी तसे समंजस. आमच्या एकाही वस्तूला त्यांनी कधी चोचसुद्धा लावली नाही.

दक्षिण ध्रुवाचं मोठं वैशिष्ट्य असं, की तिथं सहा महिन्यांचा दिवस आणि सहा महिन्यांची रात्र असते. आम्ही पोचलो, तेव्हा तिथला दिवस चालू होता

सूर्य अष्टौप्रहर तळपतच होता. ना उदय, ना अस्त!

आम्ही तिथं उतरलो, तेव्हा भारतीय वेळेनुसार रात्र होती. म्हणून भारतात सकाळ होते त्या वेळी, दिनांक दहा जानेवारीला आम्ही ध्वजवंदनाचा कार्यक्रम साजरा केला. दक्षिण ध्रुवाच्या भूमीवर आपला तिरंगा राष्ट्रध्वज डौलानं फडकू लागला. तिथल्या गाढ शांततेत आपल्या राष्ट्रगीताचे सूर निनादत असताना आमच्या अंगावर रोमांच उभे राहिले.

अँटार्क्टिकाचा प्रदेश एखाद्या विस्तीर्ण पठारासारखा आणि हिमाच्छादित आहे. इथं झाडं कुठंच दिसत नाहीत. दिसतात त्या शेवाळ्याच्या जातीच्या फक्त काही वनस्पती.

क्रील हे जलजीवी प्राणी इथं प्रचंड प्रमाणात आढळतात. एकेक क्रील म्हणजे



प्रथिनांचं जणू कोठारच! सील आणि व्हेल हे दोन भीमकाय जलचरही आम्हांला तिथं दिसून आले. सील हे सस्तन म्हणजे पशूंच्या जातीचे प्राणी आहेत. थंडीपासून बचाव करण्यासाठी निसर्गानं त्यांच्या अंगांवर चरबीचे थर निर्माण केले आहेत. व्हेल या जलचराला आपण 'देवमासा' म्हणतो. एकेक देवमासा खूपच खूप लांबीचा आणि अनेक टन वजनाचा असतो.

दक्षिण ध्रुव प्रदेशात भारतीय संशोधन केंद्रासाठी जागा नक्की करायची कामगिरी आम्हांला पार पाडायची होती. त्यासाठी हिम नसलेली किंवा अल्प हिम असलेली जागा आम्हांला शोधायची होती. अत्यंत काळजीपूर्वक निरीक्षण करून अशी जागा आम्ही शोधून काढली. संशोधन केंद्राचं 'दक्षिण गंगोत्री' हे नाव आधीच ठरवण्यात आलं होतं. जागेचं हे नामकरण आम्ही समारंभानं केलं. त्या वेळी आम्ही प्रमुख धर्मांच्या प्रार्थना म्हटल्या.

दक्षिण गंगोत्रीत हवामानाचं निरीक्षण करणारी उपकरणं आम्ही बसवली. ती उपकरणं म्हणजे स्वयंचलित—स्वतःचं नियंत्रण स्वतःच करणारी—होती. तिथल्या गोड्या पाण्याच्या सरोवरांचा, सूक्ष्म वनस्पतींचा, वेगवेगळ्या खडकांचा आम्ही अभ्यास करू लागलो. आमचे बहुतेक प्रयोग उघड्यावरच करावे लागत असल्यामुळं हवामानाच्या प्रतिकूलतेचा, तीव्रतेचा आम्हांला वारंवार अनुभव येई. हातापायांच्या संवेदना आम्हांला पुन्हा पुन्हा तपासून पाहाव्या लागत, कारण 'हिमदंशा'मुळं हातपाय निर्जीव झाल्याचे प्रकार आधीच्या काही मोहिमांत घडल्याचं आम्हांला माहीत होतं.

इथल्या हवेत आर्द्रता अशी नाहीच. त्यामुळं चेहऱ्यावर आदळणारे हिमकण हजार सुया एकदम टोचाव्या तसे टोचत. आमचे चेहरे पूर्ण झाकलेले नव्हते. वातावरणातील अल्ट्राव्हायोलेट किरणांमुळं ते काळे पडले. या साऱ्यापासून बचाव करण्यासाठी आम्ही चेहऱ्यावर पेट्रोलियम जेलीचा थर चढवला होता आणि डोळ्यांवर काळे चष्मे घातले होते. इतकी काळजी घेऊनसुद्धा आमच्या हातापायांना अनेक भेगा पडल्या होत्या.

अँटार्क्टिका हे मान्सूनचं माहेर असावं, असा शास्त्रज्ञांचा कयास आहे. भारताची बहुतांश शेती मान्सूनवरच अवलंबून आहे आणि म्हणून तिथं

मान्सूनचं संशोधन करावं आणि त्याच्या आधारे मान्सूनसंबंधीचे अचूक अंदाज वर्तवता यावे, हा संशोधनाचा मुख्य हेतू आहे. तो साध्य झाल्यास भारताच्या शेतीविकासाला कितीतरी मदत होईल. भावी काळातील भारताच्या समृद्ध शेतीचं चित्र आजच आमच्या डोळ्यांना दिसू लागलं.

सारं काही योजल्याप्रमाणं घडून येत असताना निसर्गाचा पुन्हा एकदा प्रकोप झाला. आमच्या जहाजाच्या बाजूची बर्फाची भिंत फार मोठा गडगडाट होऊन कोसळली! पण न डगमगता आम्ही आपापल्या कामाला भिडलो. तावडतोब आमचं जहाज तिथून हालवलं आणि दूरवर बिनधोक जागी नेऊन उभं केलं.

दिवस उलटत होते. आमचे प्रयोग यशस्वी होऊन खूप उपयुक्त व महत्त्वाची माहिती आमच्या हाती आली होती. एका गोष्टीचा आम्हांला विशेष अभिमान वाटत होता, की या प्रयोगांसाठी वापरलेली सर्व यंत्रोपकरणं भारतात, भारतीयांनीच तयार केली होती. हाती घेतलेल्या प्रकल्पाचा पहिला टप्पा यशस्वीपणं आम्ही पार केला, मोहीम फत्ते झाली अन् आम्हांला परतीचे वेध लागले.

१८ जानेवारी १९८२ रोजी आमच्या जहाजानं परतीच्या प्रवासासाठी नांगर उचलला. आम्हांला निरोप देण्यासाठी आमचे देखणे पेंग्विन मित्र हिमकड्यांवर जातीनं हजर होते. जणू ते आम्हांला सांगत होते, 'तुमचा प्रवास सुखाचा होवो... तुम्ही पुन्हा परताल तेव्हा आम्ही तुमच्या स्वागतासाठी इथं नक्कीच हजर राहू.'

**शब्दार्थ व टिपा:**

**मोहीम**–सामुदायिक रीतीने करायचे कार्य. **दुर्गम**–जाण्यास कठीण. **अथांग**–तळ लागत नाही असा; अतिशय खोल. **मुकाबला**–झुंज; लढा. **सरंजाम**–सामानसुमान. **एकमुखाने**–एकमताने. **उन्मत्त**–माजलेला; बेफाम झालेला. **हिंदोळणे**–एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे याप्रमाणे एकसारखे हलत राहणे. **विक्रमी**–पराकाष्ठेची; कमालीची. **गुदरणे**–ओढवणे. **रोरावणे**–रोऽऽरो असा आवाज करणे; गरजणे. **हवालदिल**–घाबरलेला; धीर सुटलेला. **रसातळ**–पृथ्वीच्या पोटातला अगदी खोल भाग. **अष्टौप्रहर**–रात्रंदिवस; अखंड. **भीमकाय**–प्रचंड देह असणारा. **संवेदना**–जाणीव. **आर्द्रता**–ओलावा. **प्रकोप**–खूप संताप; क्रोध. **प्रकल्प**–पद्धतशीर रीतीने पार पाडायची हाती घेतलेली योजना.

**तोंड देणे**–प्रतिकार करणे. संकटातून धैर्याने पार पडण्याची तयारी करणे. **रुद्रावतार धारण करणे**–अतिशय खवळणे; संतापणे. **त्रेधातिरपीट उडणे**–धांदल होणे; गडबड उडणे. **टेकीला येणे**–दमणे; थकणे. **पोटात भीतीचा गोळा उभा राहणे**–अतिशय घाबरणे. **फत्ते होणे**–यशस्वी होणे.

**स्नो स्कूटर**–बर्फाळ पृष्ठभागावरून चालणारे यांत्रिक वाहन. **हिमदंश**–बर्फाळ प्रदेशात अति थंडीने अवयव बधिर होऊन निकामी होणे. **अल्ट्राव्हायोलेट किरण**–लोलकातून सूर्यकिरण बाहेर पडले, की त्यांत तांबडा, नारिंगी, पिवळा, हिरवा, निळा, पांढरा, जांभळा असे इंद्रधनुष्यातल्यासारखे सात रंग दिसतात. जांभळ्या रंगापलीकडे न दिसणारेही काही रंग आहेत. ते विशिष्ट उपकरणांच्या साहाय्यानेच जाणवतात. त्या किरणांचा उपयोग वैद्यकीय उपचारांसाठी केला जातो. **पेट्रोलियम जेली**–पेट्रोलपासून तयार केलेले त्वचेच्या संरक्षणासाठी वापरले जाणारे मलम.

**प्रश्न :**

१. 'अँटार्क्टिका' हे नाव कोणत्या प्रदेशाचे आहे? त्याची वैशिष्ट्ये कोणती?
२. दक्षिण ध्रुव प्रदेशातील मोहिमेचा काय उद्देश होता?
३. दक्षिण ध्रुवप्रदेशात मोहिमेवर जाणाऱ्यांना कोणते शिक्षण देण्यात आले?
४. 'जणू आम्ही सारे एकाच कुटुंबाचे घटक झालो होतो!' असे लेखकाने का म्हटले आहे?
५. विषुववृत्त ओलांडताना जहाजावर कोणता अपूर्व समारंभ साजरा करण्यात आला?
६. मोहिमेतील लोकांना कोणकोणत्या संकटांशी झुंजावे लागले?
७. लेखकाने पेंग्विन पक्ष्यांना आपले मित्र असे का म्हटले आहे?
८. मोहिमेतील लोकांचा भारताविषयीचा अभिमान कोठे कोठे दिसून येतो?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. पुढील वाक्प्रचारांचा उपयोग करून वाक्ये तयार करा आणि ती लिहा:
तोंड देणे, रुद्रावतार धारण करणे, तारांबळ होणे, त्रेधातिरपीट उडणे, टेकीला येणे, पोटात भीतीचा गोळा उभा राहणे.
२. समुद्र आणि त्यावरील प्रवास यासंबंधी बंदर, धक्का, जहाज, नांगर असे काही शब्द या पाठात आले आहेत. असे आणखी काही शब्द शोधा व लिहा.
३. क्रील, सील, व्हेल या प्राण्यांची माहिती व चित्रे मिळवा.
४. 'दक्षिण ध्रुवप्रदेशाचा शोध' (लेखक – यदुनाथ थत्ते) हे पुस्तक वाचा.

* * *



# ७ महापूर

## पु. भा. भावे

**पुरुषोत्तम भास्कर भावे** (जन्म: १९१०; मृत्यू: १९८०.) कथाकार, नाटककार व पत्रकार. 'सतरावे वर्ष', 'मुक्ती', 'पहिला पाऊस' इत्यादी कथासंग्रह. 'विषकन्या', 'महाराणी पद्मिनी' इत्यादी नाटके. 'रक्त आणि अश्रू' हा वृत्तपत्रीय लेखांचा संग्रह. त्यांनी अनेक ललित लेखही लिहिले आहेत.

दिनांक १२ जुलै १९६१ हा पुणेकरांच्या आयुष्यातला एक काळाकुट्ट दिवस. या दिवशी पुण्याजवळचे पानशेतचे धरण फुटले. अनेकांची घरेदारे वाहून गेली. संसार उद्ध्वस्त झाले. हा सगळा अनर्थ लेखकाने डोळ्यांनी पाहिला, अनुभवला. त्या अनुभवाचेच हे शब्दचित्र.

**येणारा** एकेक दिवस काय घेऊन येणार आहे याची माणसाला कल्पनाही नसते. काळाच्या बासनातला एखादा दिवस फार उत्पाती निघतो. दिनांक १२ जुलै १९६१ हा भयंकर दिवस उगवला!

मुठेला महापूर लोटल्याच्या वार्ता ऐकू येऊ लागल्या. पानशेत धरण फुटल्याची कुजबुज सुरू झाली. सकाळी साडेअकराच्या सुमाराला हे सारं प्रकरण आहे तरी काय, हे पाहायला आम्ही संभाजी पुलाच्या दिशेनं निघालो. वातावरणात काहीतरी विलक्षण पालट झाल्याचं अनुभवास येत होतं. माणसांची धावपळ चालली होती. त्यांचे चेहरे पालटले होते. बोलणं पालटलं होतं. एकतर झुंडीझुंडीनं माणसं थबकली होती किंवा सैरावैरा धावत होती. समोरचं दृश्य पाहत आम्ही जागच्या जागीच थबकलो.

समोर जिकडंतिकडं गढूळ पाणीच पाणी दिसत होतं. पाण्याची गती अगदी पाहत राहण्याजोगी होती. पाणी सापासारखं सरसर चढत होतं. पसरलेल्या वाटांचा गुंता ते भराभर गिळून टाकत होतं. झाडांचे नुसते शेंडेच हालत होते. घरांचे वरचे मजले पाण्यावर तरंगल्यासारखे दिसत होते. कितीतरी पाण्याखाली

गेले होते. कितीतरी जात होते. दुकानांतील लक्षावधी रुपयांची संपत्ती पाण्यात जाणार याची कोणालाच कल्पना नव्हती.

सगळीकडं पाणीच पाणी दृष्टीला पडत होतं आणि एकसारखं ते वाढत होतं. एकामागून एक घरं पाण्याखाली जात होती. सामानसुमान वाहून जात होतं. आज पाण्याची भूक मोठी होती.

सभोवार एवढं पाणीच पाणी पसरलं असताना आकाश मात्र कोरडं होतं. नुसतेच ढग फिरत होते. त्यांतून डोकावणारे चुकार कोवळे किरण पसरलेल्या पाण्यावर तरंगत होते. ऊन पाण्यावर चकाकत होतं. त्या प्रसंगाच्या भीषणतेचा क्षणभर विसर पडावा इतकं ते दृश्य मोहक होतं, अभूतपूर्व वाटत होतं!

बाळगोपाळांना तर त्या भयंकरपणाची साधी कल्पनाही नव्हती. एवढं अफाट पाणी आपल्या अंगणात यावं यापेक्षा आणखी दुसरी पर्वणी ती काय असणार! ती खिदळत होती. पाण्यात जात होती, पाणी उडवत होती, मुलांइतक्या निरागसपणं काही तरुण माणसंही वागताना दिसत होती. घरांच्या पहिल्या मजल्यापर्यंत पाणी चढलेलं समोर दिसत असताना फाटकांच्या खांबांवर चढून काही तरुण धडाधड पाण्यात उड्या मारत होते. जलक्रीडा करत होते. मोकाट सुटलेल्या मृत्यूची त्यांना दाद नव्हती की फिर्याद!

काहींची यापेक्षाही वरची कडी होती. एकजण तर घरात पाणी शिरलं तरी ते घर सोडायला तयार नव्हता. कोणालाही जुमानत नव्हता, की पोलिसांचंही ऐकत नव्हता. अखेर डोक्यावरून पाणी जायची वेळ आली, तेव्हा लोकांनी त्याला बळेच ओढून बाहेर काढलं आणि त्याचा जीव वाचवला.

काही तासांच्या भीषण थैमानानंतर पाणी ओसरू लागलं. त्या पाण्यातून पाय रेटत आम्ही चालू लागलो. सरळ मार्गानं जाणं शक्यच नव्हतं. कुठं पाण्यानं वाट अडवली होती तर कुठं पोलिसांनी. म्हणून कपडे खोचून वळणं, वेलांट्या घेत, आम्ही संगमपुलाच्या जवळ जितकं जाऊन खेटता येईल तितकं खेटलो.

पुराचं पाणी कुठवर पसरलं होतं त्याच्या खुणा दिसतच होत्या. सगळीकडं ओला गाळ भरला होता. काटक्या, फेस, कोळसे, झुडपं यांच्या रूपानं चढलेल्या पाण्यानं आपल्या निशाण्या मागं ठेवल्या होत्या. संगमपुलाच्या

टोकाकडील कमानीची पडझड झाली होती. पावलागणिक सर्वव्यापी विनाशाचा पटच्या पट उलगडला जात होता. वृक्ष उन्मळून पडले होते. विजेच्या तारांचे खांब मेणासारखे वाकले होते. वरच्या तारांचा एकदम गुंता झाला होता. त्या तारांच्या जाळ्यांत गवतापासून गादीपर्यंत काय वाटेल ते लोंबकळत होतं. कुठल्या वस्तूनं कुठं वाहत जावं, कुठं जाऊन पडावं याला काही ताळमेळच नव्हता.



उद्विग्न मनानं आम्ही चाललो होतो. अंधार वाढत होता. चिखलानं आम्ही चिताडले गेलो होतो. ज्या खिडक्यादारांमधून प्रकाश व ध्वनी यायचा, तिथं अंधार व निःस्तब्धता दाटली होती. अंधारात अधिकच उदास दिसणाऱ्या पुण्याच्या त्या विपन्न अवस्थेकडं बघवत नव्हतं. हॉटेलांची दारं बंद होती. हॉटेलं आणि दुकानं धुऊन गेली होती. कोसळलेली झाडं मार्गांवर फांद्या पसरून आडवी पडली होती. ढेकळाप्रमाणं विरघळलेली घरं कोलमडून आपल्याच चिखलात लोळत होती.

सर्वत्र पाण्याचंच साम्राज्य पसरलेलं होतं. मोकाट सुटलेल्या पाण्यानं घराघरांवर आपल्या चढाईची रेषा मारून ठेवली होती. कुठं ही ओली रेषा पहिल्या माळ्यापर्यंत होती, कुठं दुसऱ्या माळ्यापर्यंत होती, तर कुठं पुरानं सबंध घरालाच बुचकळी दिली होती!

असं अघटित घडल्यावर माणसं मोकळ्या आभाळाखाली आश्रयाला आली होती. वाटेच्या कडेनं विसावली होती, झाडाखाली बसली होती, आप्तेष्टांकडं गेली होती, मिळेल तिथं आसरा घेत होती. पाण्याची त्यांना इतकी धडकी बसली होती, की काही माणसं जवळपासच्या टेकड्यांवरही जाऊन बसली होती.

दुसऱ्या दिवशी सकाळी जागोजाग घायाळ झालेलं पुणं आमच्या डोळ्यांसमोर पसरलं होतं. रस्ता धुऊन गेल्यामुळं खालचा खडक दिसू लागला होता. पुलांचे कठडे मोडले होते. कचकड्याचं खेळणं चेपावं तसे पूल चेपले गेले होते. बोटावर सागरगोटे उडवावे तशा प्रचंड शिळा पाण्यानं उडवून फेकल्या होत्या. छातीचा कोट करून काळाचे घाव सहन करणाऱ्या शनिवारवाड्याची भिंत दोन ठिकाणी ढासळली होती. नदीकाठच्या पेठापेठांतील घरं निर्जन बनली होती. शत्रूंनही केलं नसेल एवढं प्रचंड नुकसान धरण फुटून अनावर झालेल्या पाण्यानं केलं होतं! उभे संसार त्यानं मातीला मिळवले होते. या भीषण संकटाच्या जाणिवेनं माणसं एकमेकांना मदत करत होती. म्हणूनच पुण्याच्या या दुःखानं सारा महाराष्ट्र आणि देशही कळवळला!

## शब्दार्थ व टिपा :

**बासन**–ठेवणीतले कपडे वगैरे बांधून ठेवण्याचा रुमाल. **उत्पाती**–प्रचंड उलथापालथ करणारा. **पर्वणी**–दुर्मिळ संधी. **निरागसपणे**–निष्पाप मनाने. **उद्विग्न**–खिन्न; दुःखी.

**विपन्नावस्था**–संकटाने आलेली दुःखद स्थिती.

**छातीचा कोट करणे**–प्राणपणाने संकटाशी मुकाबला करणे.

**शनवारवाडा**–पुण्यातील पेशवेकालीन ऐतिहासिक वास्तू. पहिले बाजीराव पेशवे यांनी बांधलेला भव्य वाडा.

## प्रश्न

१. 'दिनांक १२ जुलै १९६१ हा भयंकर दिवस उगवला!' असे का म्हटले आहे?
२. 'आज पाण्याची भूक मोठी होती.' या वाक्यातून कोणत्या गोष्टी सूचित होतात?
३. पुराच्या वेळी मुले, तरुण आणि वृद्ध यांनी काय काय केले?
४. संगमपुलाजवळ गेल्यावर लेखकाला कोणते दृश्य दिसले?
५. आपत्तीत सापडलेल्या लोकांनी कुठे कुठे आसरा घेतला?
६. पुराची भीषणता कोणकोणत्या गोष्टींतून दिसून येते?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. सापासारखे सरसर चढणे, मृत्यू मोकाट सुटणे, मेणासारखे वाकणे, बोटावर सागरगोटे उडवणे, संसार मातीला मिळवणे यांचा वाक्यात उपयोग करा.
२. प्रचंड पाणलोटाचे भीषण रूप या पाठात वर्णिलेले आहे. उसळलेल्या आगीचे रूपही भीषण दिसते. स्वतःच्या कल्पनेने आगीच्या भीषण रूपाचे वर्णन करा.
३. घरांचे वरचे मजले पाण्यावर तरंगल्यासारखे दिसत होते. या वाक्यामुळे डोळ्यांपुढे एक चित्र उभे राहते. अशी चित्रे उभी करणारी आणखी काही वाक्ये या पाठातून शोधा.
४. आपत्ती नैसर्गिक असतात तशाच त्या मानवनिर्मितही असतात. अशा आपद्ग्रस्त लोकांना मदतीचा हात देण्यासाठी तुम्ही आपल्या शाळेतर्फे काय काय कराल?

* * *



# ८ उभा जन्म लोकसेवेला वाहीन !

## विश्राम बेडेकर

**विश्वनाथ चिंतामण बेडेकर:** (जन्म: १९०६) नाटककार, चित्रपटकथालेखक व दिग्दर्शक. 'ब्रम्हकुमारी', 'वाजे पाऊल आपुले' इत्यादी नाटके. 'रणांगण' ही कादंबरी व 'एक झाड आणि दोन पक्षी' हे आत्मचरित्र. 'वासुदेव बळवंत', 'नारदनारदी', 'लाखाराणी' इत्यादी चित्रपट आणि 'लो. टिळक' व 'विनोबा' इत्यादी लघुचित्रपट यांचे कथा-संवादलेखन व दिग्दर्शन.

हा उतारा 'टिळक आणि आगरकर' या नाटकातून घेतलेला आहे. टिळक आणि आगरकर हे दोघे जिवलग मित्र. सरकारी नोकरी करण्याऐवजी देशसेवेचे व्रत आपण अंगीकारले आहे, असे गोपाळराव आगरकर आपल्या आईला सांगतात. आईला मात्र वाटत असते, की आपल्या मुलाने चारचौघांसारखी चांगली सरकारी नोकरी धरून सगळ्यांना सुख द्यावे. गोपाळराव व त्यांची आई यांच्या संभाषणातून नाट्यप्रसंग कसा रंगत जातो ते वाचा.

**गोपाळराव:** आई, नमस्कार करतो अं. (तसे करतात.)

**आई:** शतायुषी हो! अरे, किती वाट पाहायला लावलीस?

**गोपाळराव:** अग, डेक्कन कॉलेज इथून पाचसात मैल लांब आहे, म्हणून वेळ लागला.

**आई:** काय, लागला निकाल? झालास ना पास? (गोपाळराव नुसते बघत राहतात.) अरे, तू बोलत का नाहीस?

**गोपाळराव:** काय बोलू! माझ्या बोलण्यानं तुला आनंद व्हायचा नाही आज!

**आई:** म्हणजे? नापास का झालास अखेरीस?

(गोपाळराव लांब निःश्वास सोडतात. आई खाली बसत) अरे कर्मा! (गोपाळरावांच्या पत्नी यशोदाबाई निराशेने हुंदके दाबत आत जातात.)

गोपाळराव: (थोड्या वेळानं) आई, रागावलीस माझ्यावर?

आई: तुझ्यावर कुठल्या तोंडानं रागावू बाळा? विद्येसाठी तू ढोरकष्ट केलेस. गावात सोय नव्हती, म्हणून घर सोडलंस. खिशात पैसे नव्हते म्हणून दूर अकोल्याला पाचशे मैल पायी रस्ता तुडवून गेलास. त्यात दम्याचं दुखणं. घालायला कपडा नव्हता, तर एकच सदरा रोज रात्री धुऊन वाळवायचा आणि तोच पुन्हा दुसऱ्या दिवशी घालायचा. तरी उरस्फोड करून शाळा, कॉलेज केलंस; रागावते कसली मी तुला!

गोपाळराव: (उठून) अग आई, मी निव्वळ...

(बळवंतराव टिळक येतात. तरुण, चोवीस वर्षांचे, थोडेसे ठेंगणे, चांगल्या दणकट अंगकाठीचे. धोतर, अंगरखा, उपरणे, उंच टोपी, हातात वर्तमानपत्रे.)

आई: कोण?

गोपाळराव: आई, हाच बळवंतराव टिळक.



आई: अस्सं होय!

बळवंतराव: बघता काय काकू! पेढे काढा आधी पेढे!

आई: पेढे? कशाबद्दल बाबा?

बळवंतराव: म्हणजे काय! गोपाळराव पास झाला तुमचा!

आई: पास झाला! गोपाळ?

बळवंतराव: हो. गोपाळराव एम. ए. झाला आज! का रे, तू सांगितलं नाहीस का अजून आईला?

आई: तू खरंच पास झालास, गोपाळा?

गोपाळराव: होय आई!

आई: अरे मग इतका वेळ – किती दुष्टपणा रे हा!

गोपाळराव: एरवी तुझ्या तोंडून माझं कौतुक कसं ऐकायला मिळतं?

आई: चल हो, यश्वदे, ए मुली, (यशोदाबाई दारात येतात) अग, गोपाळा पास झाला हो! खरंच!

बळवंतराव: काकू, असल्या बातम्या पेढ्यांबरोबर दिल्याशिवाय खऱ्या वाटत नाहीत!

आई: ते खरं, पण आम्ही आताच आलो. इतक्यात कुठून आणू पेढे?

बळवंतराव: का? मी आहे ना! मी आणले आहेत पेढे.

आई: तू आणलेस पेढे! गोपाळा पास झाला म्हणून?

बळवंतराव: अहो मीच आणणार... दुसरं कोण? हे घ्या.

आई: (पुडा हातात घेऊन) गोपाळा, त्याचे पैसे देऊन टाकायला हवेत हो.

बळवंतराव: मी घेतो काकू, सोडत नाही त्याला.

आई: (यशोदाबाईंना) हे घे ग. घरातल्या बाळकृष्णापुढं ठेव. त्याला म्हणावं, याची मोठी परीक्षा पास केलीस तशीच आता एखादी मोठी नोकरी दे. मग एक पेढा तिथं ठेव आणि बाकीचे वाट सगळ्यांना.

यशोदा: बरं. (जातात.)

आई: (टिळकांना) तुझ्यापण एकदोन परीक्षा झाल्या आहेत ना रे?

बळवंतराव: आहेत, पण गोपाळरावांइतकी मोठी एकही नाही. हा एम. ए. झाला, मी नुसताच बी. ए.

गोपाळराव: आई, यानं वकिलीची परीक्षा दिली आहे.

आई: हो का! म्हणजे चांगला मुन्सफ, मामलेदार असणार हा!

बळवंतराव: छेः, शाळामास्तर झालोय!

आई: अग बाई! असं कसं?

गोपाळराव: अग, त्यानं गेल्या वर्षी स्वतःच शाळा काढली आहे—'न्यू इंग्लिश स्कूल' म्हणून.

आई: होय? आणि पगार किती मिळतो?

बळवंतराव: कुठला! गेल्या सबंध वर्षात एक रुपाया नाही वाट्याला आला.

आई: अरे, मग चालायचं कसं? फावल्या वेळात निदान दुसरे काही उद्योग करावे.

बळवंतराव: आता करणार आहे. दोन वर्तमानपत्रं काढणार आहे – 'केसरी' आणि 'मराठा.'

गोपाळराव: ठरलं का रे पक्कं?

बळवंतराव: ठरलंच म्हणायचं.

आई: मग चांगलं आहे. त्यात तरी पैसे मिळतील ना?

बळवंतराव: पहिली काही वर्षं तरी पदरचेच जातील.

आई: म्हणजे? आता काय म्हणायचं या वेडेपणाला! घरातली माणसं कष्ट करून मुलांना शिकवतात. त्यांचे पांग फेडायला हवेत. नाही का?

बळवंतराव: ते फेडायचे म्हणून तर हा उद्योग आरंभला.

आई: म्हणजे?

बळवंतराव: आम्ही शिकलो ती शाळा कॉलेजं कशी निघाली काकू?

आई: सरकारनं पैसा घातला म्हणून.

**बळवंतराव:** मुळीच नाही. सरकारनं गरीब रयतेकडून पैसा उकळला. त्यातनंच शाळा निघाल्या. म्हणजे पांग फेडायचे ते त्या आपल्या गरीब लोकांचे. नाही का?

**आई:** मला नाही बाबा यातलं काही कळत.

**गोपाळराव:** आई, तू याच्या नादी लागू नकोस. इतकं शिकून हा असले उद्योग करतो, म्हणून त्याला गावातले लोक वेडापीर म्हणतात.

**बळवंतराव:** हं. आता आणखी एका वेड्याची वाट बघतो आहे बरं. शाळेची वेळ होते आहे. आवरायला हवं. (जातात.)

**आई:** चांगला आहे हो पोर. घरचापण बरा आहे म्हणतात.

**गोपाळराव:** थोडं वडलांनी मागं ठेवलं आहे. कोकणात खोती आहे लहानशी.

**आई:** तरीच!

**गोपाळराव:** याचं एक सोड. ते विष्णुशास्त्रीबोवा चिपळूणकर म्हणून आहेत. त्यांनी आपली शंभर रुपये पगाराची नोकरी सोडून दिली... शाळा काढायची म्हणून!

**आई:** काय सांगतोस! ऐकावं ते...

**गोपाळराव:** या माणसांना पैशाचं, बडेजावाचं मुळीच कौतुक नाही. गेल्या वर्षी शाळा निघाली, त्या दिवशी गडीच नव्हता कामाला. मग त्या बळवंतरावानं शेण घेऊन स्वतः सगळी शाळा सारवून काढलीन!

**आई:** हे ऐकायला ठीक आहे बाबा. पण आपली नाहीत हो ही कामं. गरिबांचा मार्ग म्हणजे चार लोक ज्या रस्त्यानं जातात तो. तोच सुखाचा शेवटी.

**गोपाळराव:** हूं.

**आई:** (दाराकडे जात मध्येच थांबून त्याच्याकडं बघतात.) मुला,...

**गोपाळराव:** काय आई?

आई: आज तू मला अगदी धन्य केलंस! फार मोठं यश दिलंस सगळ्यांना...

गोपाळराव: या गाठोड्यात मीठमोहऱ्या आणल्या आहेत ना, माझी दृष्ट काढायला?

आई: चेष्टा करतोस होय रे आईची? पण खरचं सांगते. कसे दिवस काढले ते आमचे आम्हांला माहीत! एखाद दिवशी हे अगदी थकून जायचे, मग म्हणायचे, गोपाळा पास झाला आपला म्हणजे सुखाचे दिवस दाखवील. (गोपाळराव पागोटे काढून खुंटीवर ठेवू लागतात. आई तिकडं बघतात व डोळे पुसतात.)

गोपाळराव: काय झालं आई?

आई: आठवण झाली रे एक.

गोपाळराव: कसली?

आई: कऱ्हाडला ते देवधर जड्ज होते, आठवतं?

गोपाळराव: हो.

आई: त्यांनी तुझ्यासारखीच फार कष्टानं विद्या केली. लहानपणी झोळी घेऊन चार घरी माधुकरीचं अन्न मागायचं. पुढं विद्या झाली. मोठा हुद्दा मिळाला. तेव्हा स्वतःच्या घोडागाडीतून घरी आले. डोईवरली रेशमी, जरीच्या झिरमिळ्यांची पगडी त्यांनी खुंटीवर ठेवली, तेव्हा त्यांच्या आईला आठवलं-त्याच खुंटीवर लहानपणी ते माधुकरीच्या भिकेची झोळी टांगून ठेवत. तिथंच ती पगडी बघून तिचे डोळे आनंदानं डबडबून गेले.

गोपाळराव: आई... (थांबतात.)

आई: बोल ना...

गोपाळराव: म्हणजे... हे बघ... असं...

आई: घुटमळतोस का असा?

गोपाळराव: आई, माझ्या नोकरीचे, मोठेपणाचे आणि घोडागाडीचे हे

मनातले मांडे तू मनाशी खात बसू नकोस. मी तसलं काहीएक करणार नाही.

**आई:** म्हणजे? म्हणतोस तरी काय बाबा?

**गोपाळराव:** मी बळवंतरावाच्या बरोबर राहणार. त्यांच्या शाळेत शिकवणार.

**आई:** गोपाळ!

**गोपाळराव:** असं मी पक्कं ठरवलंय.

**आई:** अरे, आपल्या घरचा काही विचार कर. त्या टिळकाच्या नादी लागून...

**गोपाळराव:** त्याच्या नादी लागून असं का म्हणतेस? मला स्वत:ची बुद्धी आहे.

**आई:** आपल्याच पायावर घाव घालून घ्यायची ही कसली बुद्धी तुझी! मग ही परीक्षेची उरस्फोड तरी कशाला केलीस?

**गोपाळराव:** मागल्या वर्षीच मी त्याच्याबरोबर जायचा. पण एम. ए. झालो तर शाळेचाच फायदा होईल, म्हणून थांबलो. आता मात्र...

**आई:** थोडा विचार कर. असली कामं म्हणजे अळवावरचं पाणी. आज टिळकाच्या मागं जातो आहेस, उद्या तोच तिथलं सोडून गेला म्हणजे?...

**गोपाळराव:** बळवंतराव सोडून जाईल? छे, अशक्य!

**आई:** अरे, तू लहान आहेस अजून. अनुभव नाही तुला. हे जग असं आहे बाबा. इथं आज आहे तसं उद्या राहीलच असं नाही.

**गोपाळराव:** जाईलही कदाचित. बळवंतरावही जाईल; पण मी काही त्याच्याबरोबर राहण्याची शपथ घेतलेली नाही. मी शपथ घेतली आहे माझ्या कामाची.

**आई:** कसली शपथ घेतली आहेस तू?

**गोपाळराव:** उभा जन्म लोकांच्या सेवेला वाहीन आणि त्यासाठी आमरण दारिद्र्य पत्करीन!



चित्रकार : प्रल्हाद अनंत धोंड

ताजमहाल : *निसर्गाचीही एक भावस्थिती* (निसर्गचित्र)

## ताजमहाल : *निसर्गाचीही एक भावस्थिती* (निसर्गचित्र) चित्रकार : प्रल्हाद अनंत धोंड

*हे चित्र पाहताच ते कशाचे आहे हे सांगण्याची गरज नाही. तुम्ही ताजमहालचे चित्र केव्हा ना केव्हा पाहिलेलेच असणार. कदाचित तुमच्यापैकी काही जणांनी खराखुरा ताजमहालही पाहिला असेल; पण तुम्हांला परिचित असलेल्या ताजमहालचे चित्र याहून वेगळे असेल, कारण हे दृश्य तसे नाही. नेहमीच्या चित्रांत तुम्हा-आम्हांला जो ताजमहाल दिसतो, तसा हा नाही. आपण नेहमी बघतो तो ताजमहाल चित्राच्या मध्यभागी असून भोवताली जलाशय व त्यात दिसणारे ताजमहालचे प्रतिबिंब, दोन्ही बाजूंना दिसणारा बगीचा, त्यातील ती झाडे आणि पार्श्वभूमीला निळेभोर आकाश. पण या चित्रात हा नेहमीचा देखावा दिसत नाही. ताजमहालचा एक वेगळाच देखावा येथे चित्रकाराने रंगवला आहे. हा देखावा वेगळा असला तरी तो काल्पनिक नाही. चित्रकाराने प्रत्यक्ष तिथे जाऊन, समोर दृश्य पाहून, आपल्याला हव्या त्या दिशेने हा देखावा रंगवला आहे. अशा प्रकारच्या चित्राला 'निसर्गचित्र' असे म्हणतात.*

*या चित्राचे चित्रकार आहेत प्रल्हाद अनंत धोंड. जलरंगातील चित्रणात त्यांचा फार मोठा लौकिक आहे. असे अलौकिक यश मिळवणारे हे विख्यात चित्रकार मूळचे कोकणातले. त्यामुळे त्यांच्या अनेक निसर्गचित्रांमध्ये मोठमोठ्या माडांच्या बागा, अथांग समुद्र व किनाऱ्यावर धडक देणाऱ्या लाटा, त्यात हेलकावणाऱ्या होड्या, आभाळातील विविधरंगी ढग इ. गोष्टी प्रामुख्याने दिसतात. विशेषतः विशाल असा पसरलेला जलाशय व तेवढेच वर पसरलेले आकाश या त्यांच्या चित्रातील मुख्य प्रतिमा आहेत. ताजमहाल बघतानाही त्यांना तो इतर चित्रकारांसारखा पाहणे आवडले नाही. ताजमहालच्या सर्व बाजूंनी फिरून आपल्याला हवा असा वाटणारा कोन निवडला व मग या चित्राची रचना केली. हा कोन निवडण्यातच एक थोर चित्रकार म्हणून त्यांचा वेगळेपणा जाणवतो. वरचे विशाल आकाश, खाली यमुना नदीचे निळे पात्र, भोवतालची गर्द झाडी या सुंदर निसर्ग-परिसरात एखाद्या रत्नासारखा चमकणारा ताजमहाल पाहून कोण मोहित होणार नाही? आपण नेहमी पाहतो त्याहून फार वेगळा, चित्रकाराच्या नजरेतील एक आगळा ताजमहाल येथे या चित्रात दिसतो.*

*खरा प्रतिभावान चित्रकार आपल्या समोरच्या निसर्गदृश्यात काहीतरी वेगळे पाहत असतो. ते वेगळेपण असे असते, की यापूर्वी कधी कुणी ते पाहिलेले नसते. नव्हे, त्यांना ते जाणवलेले नसते. आणि जे इतरांना जाणवलेले नसते त्याचा शोध घेण्यातच खरा चित्रकार रमलेला असतो. आपल्या अगदी नेहमीच्या परिचयाचे झाड, एखादे घर, एखादा डोंगर किंवा कोणतीही एखादी वस्तू आपण जर वेगळ्या दिशेने पाहिली तर नेहमी दिसणारी ती वस्तू तीच असूनही वेगळी दिसते. कारण वेगळ्या दिशेने आपण तिच्याकडे पाहतो.चित्रकार अशाच वेगळ्या प्रतिमेच्या शोधात असतो.शोध घेण्याच्या त्याच्या या विशिष्ट वृत्तीमुळेच तो आपल्याला परिचित असलेल्या निसर्गातून नवा सौंदर्यानुभव देणारी चित्रे रंगवतो. ताजमहालच्या या चित्रातही असा नवा सौंदर्यानुभव आपल्याला जाणवतो.*

*श्री. धोंड हे मुंबईच्या जमशेटजी जीजीभॉय कलाविद्यालयात शिकले व त्यानंतर याच विद्यालयात प्रथम अध्यापक व नंतर प्राचार्य होते. ते काही काळ महाराष्ट्र राज्याचे कलासंचालकही होते.*

(मूळचित्र : कला संचालनालय, मुंबई, यांच्या सौजन्याने.)

**आई:** गोपाळा... गोपाळा, अरे आमची नाही का रे तुला थोडीतरी आठवण झाली? निदान तुझ्या वडलांची? त्यांनी हे ऐकलं तर बसल्या जागेवरून उठण्याचं त्राण नाही उरणार त्यांना. माझं ऐक, असं करू नकोस.

**गोपाळराव:** आई!

**आई:** पदर पसरते तुझ्यापुढं. नको असं करूस.



**गोपाळराव:** काय करू मग?

**आई:** नोकरी कर. चांगली सरकारी नोकरी धर चारचौघांसारखी... सगळ्यांना सुख मिळू दे.

**गोपाळराव:** नोकरी करू? सरकारी नोकरी?

**आई:** हो.

**गोपाळराव:** बरं करतो.

**आई:** करतोस? खरं ना हे?

गोपाळराव: मी सांगतो ते ऐकून घे. मग तू सांगितलंस 'कर' म्हणून तर खचित नोकरी करतो.

आई: काय ऐकू?

गोपाळराव: ये. इथं बस अशी.

आई: (बसत) हं.

गोपाळराव: आई, मी लहानपणी शिकण्यासाठी घर सोडलं. तो दिवस आठवतो तुला?

आई: कसा विसरेन मी! काळजाचं पाणी झालं होतं! मन म्हणे–हे माझं दमेकरी पोर, कुठं जाईल? काय खाईल? कसं राहील?

गोपाळराव: आणि मी निघालो, तेव्हा तू काकुळतीनं म्हणालीस—गोपाळा नको रे जाऊ. नाही झाली विद्या तरी चालेल, पुराण सांग. मिळेल ती मीठभाकरी खाऊ इथंच.

आई: हो.

गोपाळराव: आणि मग डोळ्यांत पाणी आणून तू माझ्या पाठीवर हात ठेवलास...

आई: ... आणि तू तो हळूच काढलास आणि पुढं निघालास.

गोपाळराव: नाही आई, तो काढला नाही. माझं मन सांगत होतं... अरे, आईचा हात अजून तुझ्या पाठीवरच आहे बघ.

आई: म्हणजे!

गोपाळराव: एखादया वेळी उपास पडला, तर तुझा मायेचा हात पाठीवर आहे असं वाटून पोटसुद्‌धा भरे. अंगावर कपडा नसला तरी त्या हाताचं पांघरूण होई. अंग झाकून जाई.

आई: चल! असं कसं होईल?

गोपाळराव: व्हायचं ग. मन अगदी समाधानी राह्यचं. मग मी एक धडा शिकलो.

आई: कसला धडा?

गोपाळराव: मनात समाधान असलं तर शरीर तगतं.

आई: ते खरं आहे बाबा.

गोपाळराव: आई, सरकारी नोकरीत माझ्या मनाला समाधान व्हायचं नाही. सुख लागायचं नाही.

आई: आं! ते का?

गोपाळराव: भोवताली आपले हे गरीब, अर्धपोटी, अडाणी लोक दिसतात ग. मग सारखं वाटतं, तू जसा माझ्या पाठीवर सदैव हात ठेवलास, तसा धीराचा हात त्यांना कुणीतरी द्यायला हवा. मी द्यायला हवा. सरकारी नोकरीत हे मला कोण करू देईल? मग आपण अपराधी, अप्पलपोटे आहो म्हणून मन खात राहील, पिचेल अन् शेवटी एक दिवस ते मरून जाईल.

आई: गोपाळा, गोपाळा!

गोपाळराव: सांग, करू का मी सरकारी नोकरी?

आई: नको बाबा, नको. (उठतात.)



**शब्दार्थ व टिपा:**

**मुन्सफ**–दिवाणी कोर्टातील न्यायाधीश. **रयत**–प्रजा. **खोती**–गावचा सरकारी वसूल जमा करण्याच्या कामाबद्दल मिळालेली इनाम जमीन. **जड्ज**–('जज्ज' चे अपभ्रष्ट रूप,) न्यायाधीश. **त्राण**–बळ; शक्ती. **अप्पलपोटी**–स्वार्थी. **पिचणे**–तडा जाणे; कमकुवत होणे.

**उरस्फोड करणे**–खूप कष्ट करणे. **पांग फेडणे**–मनोरथ पूर्ण करणे. **पैसा**

**उकळणे**–अवाजवी पैसे घेणे. **अळवावरचे पाणी**–न टिकणारी गोष्ट. **पदर पसरणे**–काकुळतीने विनवणी करणे. **काळजाचे पाणी होणे**–अतिशय भीती किंवा दुःख वाटणे. **मनात मांडे खाणे**–भविष्यकाळातील काल्पनिक सुखाची मनोराज्ये रचणे. **आपल्याच पायावर घाव घालून घेणे**–स्वतःच आपले नुकसान करून घेणे.

**डेक्कन कॉलेज**–पुण्यातील पहिले शासकीय महाविद्यालय.

**केसरी व मराठा**–चिपळूणकर, टिळक व आगरकर आदींनी सुरू केलेली अनुक्रमे मराठी व इंग्रजी नियतकालिके.

**माधुकरी**–गरीब, होतकरू विद्यार्थ्यांच्या शिक्षणात खंड पडू नये म्हणून विशिष्ट घरी भिक्षा मागून गोळा केलेले अन्न.

**प्रश्न :**

१. गोपाळरावांनी शिक्षण घेण्यासाठी कोणते कष्ट केले?
२. गोपाळराव पास झाल्याचे कळल्यावर त्यांच्या आईने कोणत्या अपेक्षा बोलून दाखवल्या?
३. 'पांग फेडायचे ते आपल्या गरीब लोकांचे,' असे बळवंतराव का म्हणतात?
४. गोपाळरावांनी विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे उदाहरण कशासाठी घेतले?
५. आपले कोणते सुखस्वप्न आईने बोलून दाखवले? का?
६. गोपाळरावांनी आपले पागोटे खुंटीवर ठेवताच आईला कोणती आठवण झाली?
७. सरकारी नोकरीत आपल्याला समाधान मिळणार नाही हे गोपाळरावांनी कोणत्या गोष्टी सांगून आईला पटवून दिले?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. मनात मांडे खाणे, काळजाचे पाणी होणे, पांग फेडणे, पदर पसरणे, मन खाणे या वाक्प्रचारांचा उपयोग करून वाक्ये लिहा.
२. 'दमा' या शब्दापासून 'दमेकरी' हा शब्द झाला आहे. पुढील शब्दांपासून असे शब्द तयार करा:
कष्ट, वारी, शेत, काम, मळा.
३. 'काळजाचे पाणी होणे' या वाक्प्रचारात 'पाणी' हा शब्द आहे. 'पाणी' हा शब्द ज्यांत येईल असे आणखी काही वाक्प्रचार सांगा आणि त्यांचा वाक्यांत उपयोग करा.
४. टिळक व आगरकर यांची चरित्रे वाचून त्यांतले प्रसंग विद्यार्थिसभेत सांगा.
५. हा नाट्यप्रवेश संमेलनप्रसंगी सादर करा.

* * *



# १ बहिणीची माया

## ह. ना. आपटे

**हरी नारायण आपटे** (जन्मः १८६४; मृत्यू: १९१९.) आधुनिक कादंबरी खऱ्या अर्थाने हरिभाऊंपासून सुरू झाली. त्यांनी अनेक कादंबऱ्या आणि कथा लिहिल्या. 'करमणूक' नावाचे साप्ताहिकही चालवले. 'उषःकाल', 'गड आला पण सिंह गेला', 'सूर्योदय' इत्यादी ऐतिहासिक कादंबऱ्या. 'पण लक्ष्यात कोण घेतो?', 'भयंकर दिव्य', 'मी' इत्यादी सामाजिक कादंबऱ्या. 'स्फुट गोष्टी' या पुस्तकात हरिभाऊंच्या कथा एकत्र केल्या आहेत.

ही कथा हरिभाऊ आपटे यांच्या 'स्फुट गोष्टी' या संग्रहातून घेतली आहे. आपल्या धाकट्या भावाला अकाली येणाऱ्या आंधळेपणापासून वाचवण्याकरिता त्याची बहीण केवढे धाडस करते, हे या कथेत तुम्हांला दिसेल.

**बिचाऱ्या** गोंदूची दृष्टी दिवसानुदिवस अधिकाधिक मंद होत चालली. प्रथम आपल्या डोळ्यांपुढे बारीक बारीक काळे डाग नाचताहेत असे त्यास वाटू लागले. एक बोंगाडा कोळी लोंबकळत राहून आपल्या डोळ्यांपुढे खूप जोराने तंगड्या हालवून नाचतो आहे असे त्याला वाटे. तो नेहमी त्यासंबंधाने बोले; परंतु तो कधी कोणत्या गोष्टीची होता होईल तो कुरकूर करायचा नाही. पुरता दहा वर्षांचा असेल नसेल, पण त्याच्या अंगी विलक्षण सोशिकपणा असे.

गोंदूची बहीण गोदू बारा वर्षांची होती. तिजवर त्याचा मोठा विश्वास. ती आपल्यापेक्षा दोन वर्षांनी वडील आहे आणि तिला कितीतरी गोष्टी अधिक समजतात अशी त्याची खात्री. जे काय आपल्या मनात असेल, जे काय आपल्याला होत असेल, ते तो तिला सांगायचा. आपल्या डोळ्यांपुढे नेहमी एक कोळी कसा नाचत असतो याबद्दल तो तिला रोज सांगे. 'उद्या नाही तो तुला नाचून त्रास देणार', असे म्हणून ती त्याचे समाधान करी. पण दिवसानुदिवस त्याच्या डोळ्यांपुढचे कोळी एकाचे दोन, दोहोंचे चार असे होऊन त्यांचा नाच

फारच वाढत चालला. तेव्हा मात्र त्याला असे वाटू लागले, की अक्का म्हणते ते काही खरे होत नाही.

गोंदूच्या डोळ्यांपुढे चाललेले कोळ्यांचे तांडव जसजसे वाढत चालले, तसतशी त्याची दृष्टी अधिकाधिक मंद होत चालली. त्याला धड वाचता येईना झाले. तेव्हा गोदीने ते वाचून त्याला ऐकवावे आणि अशा तऱ्हेने त्याने अभ्यास करावा असे चार-आठ दिवस चालले. आईला उगीच त्रास होईल, असे वाटून त्यांनी तिला काही कळू दिले नाही. पण आठ दिवस झाले नाहीत, तोच एके दिवशी खेळता खेळता गोंदूला असे वाटले, की आपल्या डोळ्यांसमोरचे कोळी एका काळ्या पडद्याआड गेले. कोळी गेले, इतकेच नाही तर सगळा उजेड गेला. आपण अगदी आंधळे झालो हे त्याला कळून चुकले; परंतु त्याने दुःखाचा उद्गार काढला नाही. जणू काय दृष्टीबरोबर त्याच्या डोळ्यांतले अश्रूही नाहीसे झाले.

आईला हे कळताच आजपर्यंत आपण तिकडे दुर्लक्ष केल्याबद्दल तिला पश्चात्ताप झाला आणि ती धाय मोकलून रडू लागली. त्याचप्रमाणे वडलांनाही अतोनात वाईट वाटले. पोराचे डोळे जाण्यास आपणच कारण झालो असे वाटून तेही शोक करू लागले. पण दुःख व पश्चात्ताप करत न बसता त्यांनी गावातील सरकारी डॉक्टरांकडे गोंदूला नेले. डॉक्टरांनी तपासणी करून असे सांगितले, की मुंबईच्या चांगल्या डॉक्टरांचे उपचार घेतल्यास दृष्टी पुन्हा येण्याचा संभव आहे.

डॉक्टरांकडून परत आल्यावर त्या रात्री गोंदूच्या आईवडलांचे चांगले प्रहर दोन प्रहर बोलणे झाले. गोदी जागी होती. गोंदूच्या डोळ्यांविषयी आईबापांचे काय बोलणे चालले होते ते तिने सर्व ऐकले.

मुंबईच्या डॉक्टरांची फी जबर, शिवाय पंधरा-वीस दिवस तिथे राहावे लागेल त्याचा खर्च, एकंदरीत बरेच पैसे पडतील. आज तर जवळ एक कवडीसुद्धा शिल्लक नाही. मुंबईला जायचे तर हरतऱ्हेची काटकसर करून रुपये जमा करायचे म्हटले तरी चार-पाच महिने लागतील. हे गोदीच्या कानी पडले आणि तिला फार वाईट वाटले. त्या रात्री तिच्या मनात कितीतरी विचार

आले आणि एकदम तिच्या मनाने घेतले, 'ते काही नाही, काही ना काही करून ताबडतोब उपाय केला पाहिजे.'

दुसऱ्या दिवशी सकाळी तिने आपल्या अंध भावाला शाळेत नेऊन पोचवले. शाळेतून परत येत असता आपला सर्व विचार तिने त्याला सांगितला. तो ऐकून त्याला फारच आनंद झाला.

दुसऱ्या दिवशी पहाटे चार वाजले नाहीत तोच ती उठली.त्यांच्या गावापासून आगगाडीने मुंबई सुमारे दीड तासाच्या रस्त्यावर होती. भाडे फारच थोडे होते. गोदूजवळ आईवडलांनी दिलेले खाऊचे पैसे होते. त्या पैशाच्या जोरावर तर तिने आईवडलांच्या नकळत मुंबईस जाऊन प्रख्यात डॉक्टरांना आपल्या भावाचे डोळे दाखवण्याचा निश्चय केला. गोदू कित्येक वेळा वडलांबरोबर स्टेशनवर गेली होती. त्यामुळे तिकिट कोठे काढतात वगैरे तिला ठाऊक झाले होते. तिने चटकन आपल्या भावास उठवले आणि ती दोघेही अगदी गुपचूप घराच्या बाहेर पडली.

बरोबर सहा वाजता मुंबईची गाडी होती. त्यापूर्वी अर्धा तास स्टेशनवर येऊन योग्य वेळी तिकिटे काढून दोघेही जेव्हा गाडीत बसली, तेव्हा तिचा जीव खाली पडला. तिला मोठे भय पडले होते, की कोणी ओळखीचे भेटेल, आपणांस घरी परत घेऊन जाईल आणि आपला सर्व बेत फसेल. पण तसे झाले नाही. गाडीची शिटी वाजून गाडी निघाली आणि आपला बेत येथपर्यंत तर सिद्धीस गेला असे पाहून तिला कितीतरी समाधान झाले.

इकडे सहा वाजून गेले, उजाडले. अजून मुले उठली नाहीत असे पाहून आईस आश्चर्य वाटले; कारण ती इतका वेळ निजणारी मुले नव्हती. पण इतक्यात आईची दृष्टी आत जाते, तो गोदावरी व गोविंदा यांची अंथरुणे गुंडाळलेली असून त्यांचा ठिकाणा नाही असे दिसून आले. मग काय, जिकडेतिकडे त्यांना शोधण्याची मोठी धांदल सुरू झाली; परंतु कोठेच काही पत्ता लागेना. पोरगा आंधळा झालेला आणि त्याला घेऊन ही पोरगी गेलेली... शोध शोध शोधले; परंतु त्यांचा पत्ता लागला नाही.

सुमारे दीड तासाने भायखळा स्टेशनवर गोदावरी व गोविंदा उतरली. गाडीत

कित्येक लोकांनी त्यांस 'तुम्ही कुठं चालला?' 'या मुलाचे डोळे कशानं गेले?' असेही विचारले. त्यांनी सांगितलेली सगळी हकीकत ऐकून सर्वांना त्यांचे कौतुक वाटले. स्टेशनवर उतरून बाहेर आल्यावर गोदीने इकडेतिकडे पाहिले, तो एक पोलीस तिच्या नजरेस पडला. ती धीटपणाने त्याच्याजवळ गेली आणि तिने डोळ्यांच्या डॉक्टरांचा पत्ता विचारून घेतला. जमादारसाहेबांनी पहिल्याने जरा जोराने त्यांना विचारले, "कुठून आला? कुठं चालला?" परंतु न घाबरता गोदावरीने सरळपणाने आपली हकीकत सांगितल्यावर त्याला तिचे कौतुक वाटले. तो म्हणाला, "चला, मी तुम्हांला डॉ. गोपाळरावांच्या घरी नेऊन पोचवतो." असे त्याने म्हटले आणि त्याप्रमाणे त्याने त्यांना डॉक्टरांच्याकडे नेले.

डॉ. गोपाळरावांनी स्मित करून जमादारांना विचारले, "ही कोण लहान मंडळी आली आहेत?"



गोदावरीने जलद बोलून गोंदूचे डोळे कसे गेले वगैरे सर्व हकीकत सांगितली. डॉक्टरांनी ती सर्व ऐकून घेतली. ती काकुळतवाणीने म्हणाली, ''डॉक्टरसाहेब, बघाल आमच्या गोंदूचे डोळे? शक्य असेल तेवढा प्रयत्न तर करून पहा. सगळी फी आज जरी देता आली नाही, तरी कधी ना कधी आपली फी आम्ही खास देऊ.''

डॉक्टर त्या मुलांना घेऊन घरात गेले. आधी त्यांनी आपल्या बायकोस सांगून त्या मुलांना काही खाण्यास दिले. त्यांच्या घरचा पत्ता विचारून घेऊन मुलांच्या सुखरूपतेबद्दल घरी एक तार दिली. नंतर त्यांनी अर्धा तास गोंदूचे डोळे तपासले. परीक्षा चालली असता गोदावरी जवळच उभी होती. तिचा जीव टांगणीला लागला होता. डॉक्टर काय सांगतात हीच तिला काळजी होती.

सरतेशेवटी डॉक्टर हसत हसत गोदावरीकडे पाहून म्हणाले, ''मुली, नव्याण्णव हिश्श्यांनी तुझ्या भावाचे डोळे माझ्या हातून नीट होतील असं मला वाटतं. हो. त्यासाठी तुम्हा दोघांना इथं राहावं लागेल. मात्र तुला शुश्रूषा केली पाहिजे.''

''हो हो. करीन की! अगदी मनापासून. आणखी बरं का डॉक्टर, तुमची सगळी फी आम्ही देऊ... आज ना उद्या.''

तिचे ते अंतःकरणापासून आलेले बोलणे ऐकून डॉक्टरांना कौतुक वाटले आणि ''बरं, बरं'' असे ते हसत म्हणाले.

डॉक्टरांची तार पोचून संध्याकाळच्या गाडीने त्या मुलांचे वडील आले. आपल्या मुलांना पाहून ते गहिवरले.

गोविंदाच्या डोळ्यांवर डॉक्टरांनी त्वरित इलाज केला. डोळ्यांवर पट्टी बांधली. ती पंधरा दिवसांनी काढायची असे त्यांनी सांगितले. गोदू भावाची शुश्रूषा मनापासून करू लागली.

डोळ्यांवरील पट्टी सोडण्याचा दिवस आला. डॉ. गोपाळरावांनी गोंदूच्या डोळ्यांवरील पट्टी सोडली.

''अक्का! अक्का!'' गोंदू आनंदाने व प्रेमाने ओरडून म्हणाला आणि एकदम त्याने तिच्या गळ्याला मिठीच मारली.




"दिसू लागलं का रे गोंदू?" तिने औत्सुक्याने त्यास विचारले आणि त्याने "हो, हो, दिसू लागलं बरं!" असे उत्तर दिले.

ते ऐकून तिच्या डोळ्यांतून आनंदाचे अश्रू वाहू लागले. त्याबरोबर गोपाळरावांचे डोळेही पाणावले.

दुसऱ्या दिवशी गोपाळरावांनी मुलांस त्यांच्या घरी पाठवण्याची तयारी केली. त्यांच्याबरोबर आपला गडी दिला आणि ऐन गाडी सुटण्याच्या वेळी गोदावरीच्या हातात एक बंद केलेला लखोटा देऊन ते म्हणाले, "हे मी तुमच्यासाठी केलेल्या खर्चाचं टिपण आहे. आपल्या वडलांजवळ दे आणि त्याबद्दल काही घाई नाही म्हणून सांग."

"गोंदूचे डोळे बरे करून त्याला परत आणलं!" असे घरी जाताच गोदावरीने अभिमानाने म्हटले. सर्वांना आनंदाचे भरते आले. ते ओसरल्यावर

डॉक्टरांनी दिलेल्या लखोट्याचे गोदावरीला स्मरण झाले आणि तिने तो आपल्या वडलांना दिला.

तो फोडता फोडता वडील म्हणाले, ''कितीही जरी त्यांनी बिल केलं असलं तरी मी मोठ्या आनंदानं ते सवडीसवडीनं देऊन टाकीन.''

लिफाफा उघडून पाहतात तो आत पुढील मजकूर होता—

'गोंदूचे डोळे बरे करण्याबद्दल फी, औषधपाणी वगैरे झालेला एकंदर खर्च मी भरून पावलो!'

**शब्दार्थ व टिपा:**

**बोंगाडा**–वेडावाकडा. **तांडव**–शंकराचे नृत्य; थयथयाट. **जबर**–जास्त; खूप; फार. **धाय मोकलून रडणे**–जोरजोराने रडणे. **मनाने घेणे**–मनापासून ठरवणे. **जीव खाली पडणे**–काळजी दूर होणे. **जीव टांगणीला लागणे**–तीव्र काळजी वाटणे. **भरून पावणे**– पूर्ण समाधान पावणे.

**प्रश्न:**

१. गोंदूला आंधळेपणाची कोणती लक्षणे जाणवत होती?
२. आपण पूर्ण आंधळे झालो हे गोंदूला नेमके कशामुळे कळले?
३. गोंदूच्या वडलांना डॉक्टरांनी काय सल्ला दिला?
४. कोणती चर्चा ऐकून मुंबईला जाण्याचा गोदावरीने निर्णय घेतला?
५. मुलांबद्दल डॉक्टरांना कौतुक व आपुलकी वाटली, असे दाखवणाऱ्या कोणत्या गोष्टी या पाठात आल्या आहेत?
६. 'एकंदर खर्च भरून पावलो,' असे डॉक्टर का म्हणाले?

**स्वाध्याय व उपक्रम:**

१. गोदू, गोंदू व डॉक्टर यांचे कोणते गुण तुम्हांला दिसून येतात, ते लिहा.
२. आपल्या अंधळ्या भावाला मुंबईस घेऊन जाताना गोदूच्या मनात कोणकोणते विचार येऊन गेले असतील, ते लिहा.
३. 'चार वाजले नाहीत तोच ती उठली.' 'तोच' या शब्दाचा उपयोग करून अशी आणखी वाक्ये तयार करा.
४. धाय मोकलून रडणे, जीव खाली पडणे, जीव टांगणीला लागणे, भरून पावणे यांचा वाक्यांत उपयोग करून दाखवा.

* * *



# १० जत्रा

## अनिल अवचट

**अनिल त्र्यंबक अवचट** (जन्म: १९४४) एम.बी.बी.एस. ही वैद्यकीय पदवी संपादन केलेले डॉक्टर; परंतु त्या व्यवसायात न रमता उपेक्षित समाजांची दुःखे जाणून घेण्याच्या कार्याकडे ते वळले. त्यांची दुःखे दूर करण्यासाठी झटणारे तळमळीचे कार्यकर्ते. 'वेध', 'माणसं', संभ्रम' इत्यादी पुस्तके प्रसिद्ध.

'वाघ्या-मुरळी' या पुस्तकातून हा उतारा घेतला आहे. यात एका जत्रेचे सुरेख वर्णन केले आहे. तुम्हांलाही ते आवडेल; इतकेच नव्हे तर हा पाठ वाचताना आपणही त्यांच्यासोबत जत्रेत आहोत, असे तुम्हांला वाटेल!

**खंडोबाच्या** जत्रा अनेक ठिकाणी भरतात. चैत्री पौर्णिमेला खंडोबाची जंगी जत्रा भरत असली तरी दर सोमवती अमावास्येलाही मोठी जत्रा भरते. जेजुरी, पाली अशा या जत्रेची कितीतरी ठिकाणं आहेत. कुठं देवाला हळद लागते, कुठं देवाचं लग्न लागतं आणि जेजुरीला तर देवाची वरात निघते. म्हणून या साऱ्या जत्रा एकानंतर एक असतात. या सगळ्यांत पाहण्यासारखी जत्रा म्हणजे पालीची. म्हणून पालीला जायचं ठरलं.

साताऱ्यापासून तीस-बत्तीस किलोमीटर अंतरावर पाली हे ठिकाण आहे. गावातनं तारळी नदी वाहते. पाली आणि पेंबर अशी दोन गावं नदीच्या दोन बाजूंना आहेत. मी येणार असल्याचं महादेव पवारांना लिहिलं होतं. ते सांगलीहून तिथं येणार होते. साताऱ्याहून बाळासाहेब थोरात या स्नेह्यांबरोबर मोटारसायकलवरून मी पालीला पोचलो. रस्त्यावर खूप खेचाखेच होती. प्रत्येकाच्या कपाळी भंडारा लावलेला, अंगावरही सांडलेला. वाटेत अरुंद दगडी पूल लागला. वेस लागली. या सगळ्या गर्दीत महादेव पवार कसे सापडणार याची काळजी पडली. तोच ते स्वतः समोर नमस्कार करून उभे!

त्यांच्या नेहमीच्या ठरलेल्या गुरवाच्या घरी त्यांनी आम्हांला नेलं. ते म्हणाले, ''कधीही आलो, की आमचं उतरायचं हेच ठिकाण... आमच्या आजापासनं.'' तिथं पुण्याहून आलेली माणसंही उतरलेली होती. पुण्यात खंडोबाभक्तांचं एक मंडळ आहे, त्याचे हे लोक. जेवणं, उतरणं सगळ्यांचं इथंच. राहण्याबद्दल राहोच, पण जेवणाचेही पैसे गुरव मागत नाही. लोक समजून देतात.

तिथं चहा घेतला आणि पवारांबरोबर बाहेर पडलो. सगळीकडं भंडाऱ्याच्या पिवळ्या रंगाचं साम्राज्य होतं. लोक जातायेता हातानं भंडारा हवेत उधळत होते. बऱ्याच जणांच्या हातांत बांबूच्या जाडजूड काठ्या होत्या. रस्त्याच्या कडेनं अशा काठ्या विकणारे लोकही उभे होते. मी पवारांना विचारलं, ''या काठ्या कशासाठी?''

ते म्हणाले, ''देवळात खोटी खोटी लढाई खेळतात या काठ्यांनी. इथल्या काठ्या फार प्रसिद्ध आहेत, बरं का. अशी जाडजूड काठी दुसरीकडं मिळणार नाही, म्हणून लोक या काठ्या घरी नेण्यासाठी विकत घेतात.''

खाली वाळवंट लोकांनी फुललेलं होतं. नदीच्या पात्रात आंघोळी सुरू होत्या. लुगडी-धोतरं हातांत धरून, ती वाऱ्यावर वाळवणं चाललं होतं.

वाळवंटात खंडोबाची पूजा मांडून त्यापुढं वाघ्यामुरळीची गाणी चालली होती. अनेक ताफे आलेले दिसत होते. आपापलं कोंडाळं करून प्रत्येक ताफा गाणी म्हणत होता. नाच करत होता. जाणाऱ्यायेणाऱ्यांपैकी एखाददुसरा थांबे, एखादं मिनिट गाणं ऐके, नाणं थाळीत टाकून पुढं जाई. प्रेक्षक नसतानाही ही कलावंत मंडळी नाचगाणं करत होती. आपली सेवा रुजू करत होती.

दुपारी देवळात आलो. जुन्या पद्धतीचं दगडी देऊळ. भोवती प्रशस्त आवार. बाजूनं तटबंदी. आत खच्चून गर्दी. तटबंदीच्या वरच्या पायरीवर जागा मिळवून बसलो. काठ्या घेतलेले पंचवीस-पन्नासचे गट दौडत आत यायचे, तेव्हा शिवाजीच्या काळचं सैन्य पाहतोय असं वाटायचं. त्यांतला एकजण खाली अर्धवट बसायचा. त्याच्याभोवती इतरांनी वर्तूळ करून उभं राहायचं आणि एकाच वेळी वरून काठ्या मारायच्या. आतला माणूस आपल्या हातांतली काठी

तिरपी धरून, एकदा इकडं एकदा तिकडं, असं करून त्या काठ्या आपल्यापर्यंत भिडू देत नसे. ते बघायला मोठं गमतीचं वाटे. वरनं लोक इतक्या वेगानं काठ्या खाली आणायचे, की त्यांतली एखादी बसली तरी खालच्याचं डोकं फुटेल अशी भीती वाटायची.

देव देवळातून बाहेर येण्याची लोक वाट पाहत होते. शेवटी बऱ्याच वेळानं डोक्यावर शिंदेशाही पगडी, ऐतिहासिक काळात घालत होते तसा अंगात झगा आणि त्यावर रुंद पट्टा अशा वेशातला एक प्रौढ माणूस दिसला. त्याचे ते कपडे जुने आणि विटके होते. गळ्यात कवड्यांच्या माळा होत्या. त्याच्या हातांत उपरण्यात बांधलेले देव होते.

लोक काठ्या वर करून करून ओरडू लागले. तो माणूस त्या उसळत्या समुद्रात शिरला. लोक त्याला पुढं सरकायला विरोध करू लागले. तो परत देवळापर्यंत जायचा. वरनं फक्त त्याची पगडी पुढं-मागं होताना दिसायची. त्यावरून तो कुठं आहे ते कळायचं. त्याच्या बाजूचेही काही सैनिक असावेत. त्यांच्या मदतीनं त्यानं जोरदार मुसंडी मारली आणि सगळ्यांवर मात करून तो तटापाशी पोचला. लोक भंडारा हवेत उधळत होते. मूठ घेऊन हवेत भिरकावली, की पिवळं कारंजंच उडे. केसांत, कपड्यांवर, चेहऱ्यांवर भंडारा माखलेला होता.

मी सुरवातीला भंडाऱ्यापासून बचाव करायचा प्रयत्न केला; पण नंतर तो नाद सोडून दिला. भंडाऱ्यानं मी पूर्ण माखला गेलो.

हळूहळू काठीवाल्यांच्या पाट्या बाहेर पडू लागल्या. एकेकाला चारचार, सहासहा बैलजोड्या जुंपलेले मोठमोठे रथ बाहेर उभे होते. एकजण म्हणाले, ''यांचे नंबर ठरलेले असतात मानाप्रमाणं. त्यांतला नंबर सोडून कोणी पुढं जायचा प्रयत्न केला तर इथं एका मिनिटात मोठी दंगल उसळेल.''

खेचाखेचीतनं पुढं सरकत होतो. रस्त्यावर येऊन पुलाजवळ उभा राहिलो. महादेव पवार म्हणाले, ''आपण इथंच थांबू, म्हणजे इथनं देव बाहेर पडताना बघायला मिळेल. पुलावरून देवाची मिरवणूक दिसेल.''

गाण्यात 'मल्हारी... मल्हारी' असायचं. देवळातून काठीवाल्यांचे जथे बाहेर



पडू लागले. त्यांच्या पुढंमागं डफ वाजवणारे होते. कोणी टाळ्या वाजवत होतं. पंढरपूरला 'ज्ञानबा-तुकाराम' असतं, तसा इथं 'सदानंदाचा येळ्कोट' हा घोष असतो. पंढरपूरसारख्या झांजा इथं नव्हत्या. घोंगड्या खांद्यावर घेतलेले लाल, गडद जांभळे फेटे बांधलेले बरेच लोक दिसत होते.

वेशीवर पुष्कळ लोक उभे होते. खालून एखादा रथ चालला,की ते वरून घमेल्यानं भंडारा ओतत होते. भंडारा फेकत त्या वेळी प्रकाश चमकावा तसा पिवळा रंग दिसे. तो खाली विरळ विरळ होत येई. काळ्या रंगाची वेस, बाजूचे तट, माणसांप्रमाणंच सारं भंडाऱ्यानं न्हालेलं होतं. रथ जात होते. सगळ्यात शेवटी सजवलेला हत्ती आला. त्याच्या हौद्यात बरेच लोक दाटीवाटीनं बसले होते. त्या हत्तीवर देव होता. तो अर्थात उपरण्यात बांधलेला. त्यामुळं दिसत काहीच नव्हतं. खाली हजारो काठ्या नाचत होत्या. देव वेशीखालून जाताना लोकांनी अक्षरशः भंडाऱ्याची पोतीच्या पोती वरनं ओतली. ती वेस, तो हत्ती, ते लोक हे सगळं त्या पिवळ्या रंगात दिसेनासंच झालं.

पुलावर आलो. खाली वाळवंटात पाहिलं, तर त्या सबंध परिसरात माणसांचा सागरच पसरलेला होता. लोक मुठीमुठींनी भंडारा उधळत असल्यानं

तो सागर खदखदता वाटत होता. पवार म्हणाले, "तिथं पलीकडं पेंबर गाव आहे. देव इथून घरनं निघाला. पेंबरला त्याचं म्हाळसाबरोबर लग्न लागणार."

मी विचारलं, "ते पाहता येईल का?"

पवार म्हणाले, "तिथं या गर्दीतनं पोचायला दोन तास लागतील आणि माणसांची तर एवढी गर्दी! पाहायला काहीच मिळत नाही. आणि असतं काय तर मूर्तींचं लग्न. अंतरपाट धरतात,पण कुणाचं कुणाला काही ऐकू येत नाही!"

एका बाजूनं एखादा रथ नदीच्या पात्राच्या दिशेनं सपाटीवरनं येताना दिसायचा. उतारावरनं जोरात येताना मात्र तो माणसांची गर्दी कापत यायचा. फक्त वरचा कळस पुढं जाताना दिसायचा. त्या वेळी श्वास सोडल्यासारखे भंडाऱ्याचे फवारे गर्दीतनं वर उडायचे. संध्याकाळची पिवळी किरणं सगळीकडं पसरली होती. त्यामुळं तो पिवळा रंग आता ज्वालेसारखाच दिसायचा.

शेवटी देवाचा हत्ती येताना दिसला. सगळे मानकरी आणि तो हत्ती भंडाऱ्यानं भरलेले होते. हा हत्ती नेहमीचा असावा. कारण इतक्या भंडाऱ्यात दुसरा हत्ती टिकलाच नसता. तो बुजून सैरावैरा पळत सुटला असता.

उतारावर हत्ती वेगानं खाली येऊ लागताच धस्स झालं. मनात म्हटलं, कुणी या हत्तीखाली चिरडलं जाऊ नये म्हणजे मिळवली! या वेळी तर इतका भंडारा उधळला गेला, की सगळ्या सागरानंच पेट घेतला आहे, असा भास झाला.

देव पेंबराकडं निघून गेले आणि आम्ही माघारी वळलो.



**शब्दार्थ व टिपा :**

**सोमवती अमावास्या**–सोमवारी येणारी अमावास्या. **गुरव**–ग्रामदेवतेचा पुजारी. **वाघ्यामुरळी** –खंडोबाला वाहिलेले स्त्री-पुरुष. **शिंदेशाही पगडी**–विशिष्ट बांधणीची पगडी. **पार्टी**–गट. **जथा**–तुकडी; गट. **सदानंदाचा येळ्कोट**–खंडोबाचा जयजयकार.

**सेवा रुजू करणे**–सेवा सादर करणे. **मुसंडी मारणे**–आवेशाने गर्दीत घुसणे. **धस्स होणे**–अतिशय भीती वाटणे.

**प्रश्न :**

१. 'पाहण्यासारखी जत्रा म्हणजे पालीची,' असे का म्हटले आहे?

२. वाळवंटात लेखकाला काय काय दिसले?

३. तटबंदीच्या वरच्या पायरीवरून लेखकाने कोणते गमतीचे दृश्य पाहिले?

४. 'उपरण्यात बांधलेले देव घेऊन येणारा माणूस उसळत्या समुद्रात शिरला,' असे लेखकाने का म्हटले आहे?

५. लेखकाला पुलावरून दिसलेल्या मिरवणुकीचे थोडक्यात वर्णन करा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खंडोबाच्या जत्रेत उधळलेल्या भंडाऱ्याचे लेखकाने अनेक प्रकारे सुंदर वर्णन केले आहे. त्यांतील तुम्हांला आवडलेली वाक्ये शोधा आणि ती वहीत लिहून ठेवा.

२. मुसंडी मारणे, धस्स होणे, सेवा रुजू करणे या वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.

३. 'मूठ घेऊन हवेत भिरकावली.' इथे 'मूठ' म्हणजे मुठीत घेतलेला भंडारा. 'सारा वर्ग हसू लागला.' हे एक याच पद्धतीचे वाक्य आहे. पुढील शब्दांचा या प्रकारे उपयोग करून वाक्ये बनवा –

देश, शेत, रस्ता, डबा.

४. 'दगडी देऊळ' यात 'दगडी' शब्दाने देवळाबद्दल विशेष माहिती मिळते. खालीलपैकी प्रत्येक शब्दाने ज्याच्याबद्दल काही विशेष माहिती मिळते असे शब्द शोधा आणि 'दगडी देऊळ' या जोडीसारख्या जोड्या जमवा ––

पितळी, कागदी, लोखंडी, रेशमी.

५. या पाठात अनेक दृश्यांची सुंदर वर्णने आहेत. त्यांतील तुम्हांला विशेष आवडलेल्या दृश्याचे चित्र काढा.

६. तुम्ही पाहिलेल्या एखादया जत्रेची माहिती पत्ररूपाने मित्राला कळवा.

* * *



# ११ अब्दुलमिया

श्री. ना. पेंडसे

**श्रीधर नारायण पेंडसे** (जन्म: १९१६) कांदबरीकार व नाटककार. कोकणचा निसर्ग आणि तिथले जीवन यासंबंधी ते प्रामुख्याने लिहितात. 'गारंबीचा बापू', 'हद्दपार', 'रथचक्र' या त्यांच्या कादंबऱ्या. 'रथचक्र' या कादंबरीला साहित्य अकादमीचे पारितोषिक. 'संभूसांच्या चाळीत', 'यशोदा', 'राजेमास्तर' ही त्यांची नाटके.

'एल्गार' या कादंबरीतील हा एक उतारा. कादर व रघुनाथ हे दोन जिवलग बालमित्र. कादरचे वडील अब्दुलमिया किती प्रेमळ होते याचा अनुभव हा उतारा वाचताना येतो.

**एके** काळचा उनाड 'रघ्या बेंद्रे' ट्रेनिंग कॉलेजात हुशार विद्यार्थी म्हणून ओळखला जात होता आणि बुद्धिमत्तेच्या दृष्टीनं ज्याच्या आसपासही मी फिरकू शकलो नसतो असा तो कादर दादरला आज घाणीवर तेल काढीत होता! पोंक्षेमास्तरांना आमचं दोघांचं हे भवितव्य पाहून विस्मयाचा धक्काच बसला असता. गरिबी आणि परिस्थिती यामुळं अशी किती अव्वल दर्जाची बुद्धिमत्ता वाया जात असेल!

काही दृष्टीनं कादर माझ्यापेक्षा निःसंशय भाग्यवान होता. त्याची बुद्धिमत्ता असामान्य होती. सातव्या इयत्तेत आम्ही गेलो त्या वर्षभर त्याचे वडील अब्दुलमिया आजारी होते. घरची तेलाची घाणी आणि इतर कामं यातच कादरचा सारा वेळ जाई. हे सारं सांभाळून त्याला परीक्षेलाही बसणं जवळजवळ अशक्य होतं. खुद्द माझा नि पोंक्षेगुरुजींचा आग्रह पडला म्हणूनच तो परीक्षेला बसला आणि साऱ्या जिल्ह्यात पहिला आला! सातव्या इयत्तेत येईपर्यंत मी कादरशी सामना देणं ही कल्पनाच हास्यास्पद होती. पुढं मी मेहनती बनलो. उलट कादरची घरची परिस्थिती डबघाईला येऊ लागली. यामुळं सातवी इयत्ता आम्ही दोघांनी गाजवली. आमच्या चुरशीला पोंक्षेगुरुजी कौतुकानं वाघसिंहाची

झटापट म्हणत.

एवढं होतं तरी माझी पायरी मी ओळखून होतो. माझ्या यशाचं मूळ अविश्रांत मेहनतीत होतं. कादरचं सारं यश सहज होतं. कादरच्या वडलांसारखे वडील लाभणं मला अजूनही भाग्याचं वाटतं. आयुष्यातील कर्तबगारीचं कौतुक इतरांनी करणं आणि खुद्द आईवडलांकडून होणं यांतील फरक माझ्यासारख्या माणसालाच फक्त कळेल. तो आनंद काही न्याराच आहे! या बाबतीत मी निखालस पोरका होतो. योग्य काळी योग्य माणसाजवळ मुलांचं योग्य कौतुक करावं अब्दुलमियांनीच!

त्यांच्या माजघरात मी, मिया, अम्माजान असे आम्ही कधी कधी गप्पा मारत बसायचे. कादर कुठं बाहेर गेलेला असायचा. माझी जायची वेळ झाली आणि मी निघालो म्हणजे मिया मला हात धरून खाली बसवत.

''अरे रघ्या, घाई कसली आहे? आपले 'पंडित' येऊ देत. मग जा. तुमच्या दोघांच्या गप्पा ऐकल्या म्हणजे बरं वाटतं जरा.''

'पंडित' हा शब्द मियांचा फार आवडता होता. रंगात आले की कादरला ते 'पंडित' म्हणून संबोधत. कादरबद्दल त्यांना रास्त अभिमान वाटत असे.

'वाटेल ते झालं तरी कादरला इंग्रजी शिकवायचं,' असं मिया वारंवार म्हणायचे. त्यांचं म्हणणं बरोबर होतं. कादरच्या बुद्धिमत्तेला विशाल क्षेत्र मिळतं, तरच तिच्या भव्यतेची कल्पना येती.

कादरच्यात आणि माझ्यात साम्यापेक्षा विरोधाच्या गोष्टीच अधिक होत्या. इतक्या वेगळ्या जगात वावरणारे आम्ही इतके एकरूप होऊ शकलो हीच नवलाची गोष्ट आहे! माझे वडील मुलखाचे कडक तर अब्दुलमिया मुलखाचे लागट.

कादरखालोखाल त्यांनी माझ्यावर लोभ केला. कादरचे आणि माझे जिव्हाळ्याचे संबंध हे त्याचे कारण असू शकेल; पण साऱ्या साखरपेंडीतच मिया प्रेमळ म्हणून प्रसिद्ध होते. तांबडी लुंगी, पोटावरनं रुळून खाली आलेला मळका गंजीफ्राक, डोक्याला बांधलेली टापशी आणि एका हातात काळ्या बेरीनं मढलेलं तेलाचं मडकं घेऊन चाललेली मियांची गिड्डी मूर्ती प्रत्येक

साखरपेंडीकराच्या दृढ परिचयाची होती. गावात उंड्या गोळा करून अर्धेलीच्या करारावर गाळण्याचा त्यांचा मुख्य व्यवसाय होता. तसं पाहिलं तर कादरची ओळख व्हायच्या आधीपासूनच मी मियांना ओळखत होतो. कारण माझे वडील अण्णा आणि मिया यांची उंड्या आणि तेल यावरनं होणारी हमरीतुमरी मी अनेक दिवस पाहत आलो होतो.

"अन्हा....." करून मिया पडवीत यायचे अन् पायठणीजवळ बसायचे. खुरमुंडी घालून, उभ्या ढोपरांवरून लांब सोडलेले हात अशा थाटातील त्यांचं चित्र मला अजूनही चांगलं आठवतं. आम्ही जवळ गेलो, की ते आमच्या पोटावर टिचकी मारत. एक दिवस अण्णांनी हे पाहिलं नि माझ्या अंगावर ते खेकसले,"शिंचो, इथं कशाला मरायला आला आहेस ? चल पळ. विहिरीवर आंघोळ कर."

त्या दिवसापासून मियांचं वात्सल्य आम्हांला पुनश्च अनुभवायला मिळालं नाही! त्या दिवसांत मला एक आश्चर्य असं वाटे – अण्णा एवढे कडाडून बोलतात नि म्हातारा स्तब्ध कसा! दोन पायली उंड्यांचं बेलीत आणलेलं तेल बरोबर आहे हा मुद्दा यत्किंचितही न सोडता मिया हसत हसत उत्तर द्यायचे नि अण्णा आदळत-आपटत तेलाचं मडकं माजघरात न्यायचे. मियांची माझी येथवर तोंडओळख होती.

कादरकडं मी प्रथमच गेलो तेव्हा माझ्याकडं हसून मिया एकदमच म्हणाले, "अरे! अण्णाभटजींचा 'रघ्बा' इकडं कोणीकडं? संभाळ हं, अण्णा मारतील."

'अण्णा मारतील!'... म्हातारी माणसं काही वेळा असं काही बोलून जातात, की त्याचा सही सही पडताळा येतो. मियांचे हे उद्गार खरे ठरायची वेळ पुढं एकदा आली होती; पण या वेळी 'अण्णा मारतील' इकडं माझं लक्ष नव्हतं. 'रघ्बा' हेच शब्द माझ्या कानांत घुमून राहिले. मिया मला नावानं ओळखत असतील असं वाटलं नव्हतं. या एका शब्दानं मियांनी मला सर्वस्वी जिंकलं. 'रघ्या' या उद्धट नावाशिवाय दुसरं काही ऐकायची माझ्या कानांना सवयच नव्हती. किंबहुना 'रघ्बा' हे नाव ऐकेपावेतो 'रघ्या'मध्ये काही उद्धटपणा आहे असंही वाटलं नव्हतं! मुलांच्या सुंदर नावाचे उद्धट अपभ्रंश करण्याची कला

आमच्या कोकणात कळसास पोचलेली आहे. 'रघुनाथ'चं 'रघ्या', 'अवधूत'चं 'औध्या', 'अनसूया'चं 'अनशी' असं प्रत्येक नाव तावडीत सापडलं, की त्याचा अपभ्रंश केलाच! तेव्हा मियांच्या 'रघ्बा'तील स्निग्धतेनं मला मोहून टाकलं यात नवल नाही. माझ्यातील मानबिंदू जागृत करण्याचं कार्य त्या एका शब्दानं केलं होतं.

संध्याकाळी शाळा सुटली,की कादरच्या घरी अभ्यासाला जायचा माझा क्रम असे. घाणीच्या बैलाला 'च्यॅक च्यॅक' करत मिया बसलेले असायचे. आम्हांला पडवीत पाहताच तेथून ओरडायचे – ' या रघ्बा.' दिवेलागणीपर्यंत आमचा अभ्यास चाले. फारच उशीर झाला म्हणजे खुद्द मिया कंदील घेऊन



कोळीवाड्यापर्यंत मला पोचवायला येत. मला काळोखाचं किंवा जनावरांचं भय असं कधी वाटलं नाही; पण मियांना ते पटत नसे. माझ्या ' नको नको'ला बाजूला करून ते वाट चालू लागत आणि गप्पा मारत कोळीवाड्याच्या तिठ्याशी आले तरी परतत नसत. मे महिन्यात आंब्या-फणसाचा मोसम आला म्हणजे 'मियांकडं जाणं नको,' असं करून टाकायचे. अभ्यास संपवून घरी जायला निघालो म्हणजे अवचित कुठून तरी ते प्रगट होत.

''वा वा वा, रघ्बा, अरे चाललास कुठं? थांब जरा, अरे समजलं, घरीच जायचं आहे ना? जाशील!'' असं म्हणून ते बोलत, ''कादर, ए कादर, अरे तो कापा फणस आण इकडं. सारा दिवस ठेवून दिलास रघ्बाकरता नि तो तर निघाला.''

''पोट फुगलंय म्हणतोय तो.''

''बाऽरं, बाऽरं, तू आण तर खरा. देहाला शोभेल असं बोलावं माणसानं. हं रघ्बा – घ्या हा फणस, ही कोयती. चल फोड. खोबऱ्या फणसाचा आहे – विहिरीजवळचा. यंदा रघ्बाच्या हातून नवं करायचं, असं ठरवलंय आम्ही.''

ही प्रेमगंगा थोपवण्याचं सामर्थ्य माझ्यात नव्हतं! मोसमातला माझा पहिला फणस, पहिला आंबा कित्येक वेळा मियांकडंच खाऊन होत असे.

**शब्दार्थ व टिपा :**

**विस्मय**–आश्चर्य. **नि:संशय**–खात्रीपूर्वक. **हास्यास्पद**–चेष्टा होण्याजोगी. **निखालस**–अगदी. **संबोधणे**–हाक मारणे; उद्देशून बोलणे. **रास्त**–योग्य; उचित. **लागट**–प्रेमळ; लाघवी. **टापशी**–डोक्याला गुंडाळायचे कापड वगैरे. **बेरी**–तेल किंवा तूप यांच्या बुडाशी साचलेला गाळ. **डेंडी**–तेलबी. **हमरीतुमरी**–बोलाचाली. **दृढ**–दाट; घनिष्ठ. **खेकसणे**–एखाद्यावर चिडून ओरडणे. **अपभ्रंश**–एखाद्या शब्दाचे बदललेले रूप.

**डबघाईला येणे**–मोडकळीला येणे.वाईट अवस्था येणे.**आपली पायरी ओळखून असणे**–आपली लायकी ओळखणे. **कळसास पोचणे**–पूर्णत्वाला पोचणे. **नवे करणे**–शुभारंभ करणे. **खुरमुंडी घालणे**–दोन्ही पायांचे गुडघे वर करून व मान खाली घालून बसणे.

**अर्धेली**–मालकाला मालकीबद्दलचा अर्धा वाटा देणे आणि मेहनतीबद्दल अर्धा

वाटा आपण घेणे. **जनावर**–सापाला साप न म्हणता 'जनावर' म्हणण्याची पद्धत रूढ आहे. **कापा**–फणसाची एक विशिष्ट जात. याचे गरे मोठे व चवदार असतात. बरक्या फणसाच्या गऱ्यांसारखे ते गिळगिळीत नसतात.

**प्रश्न :**

१. आपल्यापेक्षा कादर निःसंशय भाग्यवान होता, असे रघू का म्हणतो?

२. कादर व रघू यांच्यात साम्यापेक्षा विरोधाच्या गोष्टी कोणत्या आढळतात?

३. मियांचे वात्सल्य कोणकोणत्या गोष्टींतून रघूला जाणवले?

४. 'रघ्वा' या एका शब्दानं मियांनी मला सर्वस्वी जिंकलं, असे रघूला का वाटले?

५. अण्णा आणि मिया या दोघांच्या वागण्यात महत्त्वाचा फरक कोणता आढळतो?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. डबघाईला येणे, पायरी ओळखून असणे, कळसास पोचणे आणि रंगात येणे या वाक्प्रचारांचा उपयोग करून वाक्ये तयार करा.

२. सापाला 'साप' न म्हणता 'जनावर' म्हणण्याची पद्धत आहे. कदाचित त्यातील भय, अशुभता तोंडाने बोलावीशी वाटत नाही. ही भाषेची एक लकब आहे. अशा तऱ्हेची आणखी काही उदाहरणे शोधा व ती वहीत टिपून ठेवा.

३. या पाठाच्या आधारे अब्दुलमियाचे दहाबारा ओळींत वर्णन करा.

४. रघू घरी जायला निघाला, की अब्दुलमिया त्याला आग्रह करून ठेवून घेत. त्या वेळचे मियांचे बोलणे, वागणे साभिनय करून दाखवा.

* * *







# १२ माझा विरंगुळा

**यशवंतराव चव्हाण**

**यशवंतराव बळवंतराव चव्हाण** (जन्म: १९१४; मृत्यू: १९८४) थोर राजकीय नेते. त्यांनी स्वातंत्र्यलढ्यात भाग घेतला आणि त्यासाठी तुरुंगवासही भोगला. महाराष्ट्र राज्याचे पहिले मुख्यमंत्री. राजकारणात राहूनही साहित्यादी कलांविषयी प्रेम व आपुलकी. लेखन-वाचन करण्यात त्यांना आनंद वाटे. 'सह्याद्रीचे वारे', 'युगांतर' ही त्यांच्या भाषणांची पुस्तके.

'कृष्णाकाठ' हा त्यांच्या आत्मचरित्राचा पहिला खंड. हा उतारा त्यातून घेतला आहे. माणसाला काहीना काही विरंगुळा हवा असतो. त्यामुळे जीवनातला आनंद लुटता येतो. आपला विरंगुळा कोणता, ते या पाठात यशवंतरावांनी सांगितले आहे.

**योगायोगानं** म्हणा अगर आपल्या आवडीनिवडीप्रमाणं म्हणा, प्रत्येक माणूस आपलं कार्यक्षेत्र निवडत असतो. त्यामध्ये तो आपलं सबंध आयुष्य घालवतो. त्यातही त्याला स्वतःचा असा एक विरंगुळा म्हणून असतोच. कारण रोजच्या धकाधकीतून त्याला जे काही थोडे विसाव्याचे क्षण मिळतात, त्या वेळी हा विरंगुळा त्याला आनंद मिळवून देत असतो. माझा विरंगुळा कशात आहे? माझ्या दृष्टीनं मोठा कठीण प्रश्न आहे. राजकारणात प्रत्यक्ष धकाधकीचं काम करणाऱ्या माझ्यासारख्या माणसाला हा शोध घेणं कसं जमणार? शिवाय तिऱ्हाइताच्या दृष्टीनं स्वतःकडं पाहता येणंसुद्धा मोठी अवघड गोष्ट आहे.

मी जेव्हा माझ्या जीवनाकडं पाहतो, त्या वेळी प्रथम माझ्या डोळ्यांसमोर एक चित्र उभं राहतं — ज्या ठिकाणी मी खेळलो, बागडलो, त्या माझ्या कऱ्हाड गावाचं. सर्व व्यापांतून सवड काढून कऱ्हाडच्या प्रीतिसंगमावर मी काही काळ निवांतपणं घालवावा अशी इच्छा वारंवार माझ्या मनात येते. सुदैवानं नुकतीच मला तशी संधी मिळाली आणि कऱ्हाडला प्रीतिसंगमावर मी थोडा वेळ जाऊन आलो. त्या वेळी भूतकाळातील आठवणींनी माझं मन भरून आलं. माझ्या गत जीवनाचा चित्रपट झरझर माझ्या डोळ्यांसमोर येऊन गेला. माझी आई, माझे बंधू व इतर कुटुंबीय मंडळी या सर्वांच्या प्रेमळ सहवासात घालवलेले दिवस मला आठवले—आणि अपूर्व आनंदाच्या गोड स्मृती माझ्या हृदयाला स्पर्श करून गेल्या.

मी कितीही थकलेला असलो तरी घरातील आणि कुटुंबातील प्रेमळ व निर्मळ वातावरणात माझं मन उल्हसित होतं. कुटुंबातील मंडळींमध्ये बसून हास्यविनोद, गप्पागोष्टी करत वेळ घालवण्यात केवढा आनंद असतो! कुटुंबातील मंडळींबरोबर अशा प्रकारे काही वेळ घालवणं हा माझा एक आवडता विरंगुळा आहे.

लहानपणी शाळेत असताना किंवा तरुणपणी राजकीय चळवळीत रमलो असताना मला कधी कधी काव्यकल्पना सुचत नि त्या कल्पना त्या वेळी मी कागदावरदेखील उतरवत असे. कॉलेजात असल्यापासून साहित्याचं मला फार मोठं आकर्षण वाटत असे आणि अद्यापही ते तसं वाटतं. म्हणून आजदेखील

वेळात वेळ काढून साहित्याची गोडी मी चाखतो आणि त्यामुळं मला मनमुराद आनंद मिळतो. संत ज्ञानेश्वरांच्या वाङ्मयातील गोडवाही मी अतिशय रसिकतेनं चाखला आहे. ज्ञानेश्वरी हा मराठी भाषेचा महान ठेवा आहे. साहित्यिकांच्या शब्दांतील अफाट सामर्थ्य पाहून कित्येक वेळा आपलं मन थक्क होतं. मॅक्झिम गॉर्की यांची 'आई' ही कादंबरी मी ज्या वेळी प्रथम वाचली, त्या वेळी माझ्या हृदयात विलक्षण कालवाकालव झाली. असं काही वाङ्मय वाचलं, की आपलं व्यक्तिगत आयुष्य आपण क्षणभर विसरून जातो आणि काही काळ अपार सुखात रममाण होतो.

वेरूळ येथील कैलास आणि इतर लेणी ज्या वेळी प्रथम पाहिली त्या वेळच्या माझ्या भावना मला आजही आठवतात. ती लेणी पाहून माझं मन भारावून गेलं. जे लोक मला त्या लेण्यांसंबंधी माहिती देत होते त्यांचं अस्तित्वदेखील मी क्षणभर विसरून गेलो. माझं मीपण विसरलो आणि काही काळ एका स्वर्गीय अशा आनंदात रममाण झालो. मला वाटतं, आजकालच्या धकाधकीच्या जीवनात, व्यक्तीच्या आयुष्यात असा क्षण येणं हाच त्याला लाभणारा खरा विरंगुळा होय. असा विरंगुळा प्रत्येकाच्या जीवनामध्ये जितका जास्त येईल तितकं त्याचं जीवन अधिक सुखी बनेल.

साहित्याची गोडी आपण एकान्तात चाखतो; पण समाजात प्रत्यक्ष लोकांमध्ये बसून नाटक पाहणं, लोकनाट्याची मौज लुटणं, कुस्त्यांची दंगल बघणं किंवा क्रिकेटचे सामने पाहण्यात दंग होणं यांतील मौज काही औरच! एखाद्या जुन्या नाटकाचा पडदा वर जाऊन पेटीचे सुमधुर स्वर वातावरणात घुमू लागले किंवा सारंगीचे मृदू सूर कानी पडले, की आपण एका निराळ्याच जगात प्रवेश करतो. त्या वेळी आपल्या भावना कशा हेलावून जातात! त्याचं वर्णन तर शब्दांनी करताच येणार नाही. बालगंधर्वांची ती जुनी गाणी आठवली किंवा त्या काळातील नटश्रेष्ठांच्या अभिनयकौशल्याची नुसती आठवण झाली, तरी मनात असंख्य गोड स्मृती जाग्या होतात. केशवराव दाते यांच्यासारख्या कसलेल्या नटांच्या भूमिका आणि जुन्या काळातील ती भरदार नाटकं यांच्या आठवणीदेखील किती सुखद वाटतात! रसिकांच्या समुदायामध्ये बसून

नाटकांची गोडी चाखणं किंवा कुस्त्यांच्या, तमाशांच्या फडांची मौज लुटणं, अशा कितीतरी गोष्टी जीवनात आहेत, की त्यांच्यापासून मी अक्षरशः मनसोक्त आनंद लुटला आहे.

तथापि, ध्येयवादी वृत्तीनं ज्याला काही कार्य करायचं आहे, त्याला केवळ स्वप्नाळू वृत्ती उपयोगी पडत नाही. अशा वेळी जीवनातल्या कटू सत्यावर प्रकाश टाकणाऱ्या आणि वास्तवतेची झळ कमी करणाऱ्या हास्यरसाची जोड त्याला हवीच. गंभीर गोष्टींकडंसुद्धा काहीशा हसऱ्या चेहऱ्यानं बघता येण्याएवढा सोशिकपणा आपल्या अंगी असायला हवा. रोजच्या व्यवहारात अशा वृत्तीनं जर आपण काम करू शकलो, तर क्षणाक्षणाला जीवनाचा आनंद आपल्याला लुटता येईल.

काहीतरी नवं शोधावं व जे सापडेल त्यात रस घ्यावा, अशा वृत्तीनं आपण जीवन जगलो,तरच त्याला खरं जगणं म्हणता येईल. 'ह्यात काय आहे, त्यात काय आहे,' अशा अरसिक, तुसड्या वृत्तीनं आपण जर प्रत्येक क्षण वाया घालवला तर जीवनाचा लपंडाव आपण हरलोच असं समजायला हरकत नाही. जीवनात जे सुखाचे क्षण येतात ते सूर्याच्या कोवळ्या किरणांसारखे सोनेरी, सतेज असतात. ते क्षणभर राहतात आणि नंतर कडक होतात; परंतु जेव्हा किरण कोवळे असतात त्या वेळचं त्यांचं तेज, ते रम्य स्वरूप पाहून मनाला आल्हाद वाटतो. नदीच्या खोल डोहात दगड टाकला, की पाण्यावर तरंग उठतात. एकातून एक अशी असंख्य वर्तुळं पसरत जातात आणि मग पाहणाऱ्याला मोठी मजा वाटते. जंगलाच्या वाटेनं जात असताना उन्हाच्या वेळी एखादा झरा दिसला, की त्याचं पाणी पिताना केवढा आनंद होतो! एवढंच कशाला, ओढ्याच्या काठी भरगच्च जांभळांनी लहडलेल्या झाडाची चार जांभळं तोंडात टाकली, की ती किती गोड लागतात! बाजारातून विकत आणलेल्या जांभळांना त्या गोडीची सर कधी येईल का? जीवनामधील आनंदाचे क्षण हे असे असतात.

जुन्यापासून बोध आणि नव्याचा शोध घेत जाणारा हा मानवी जीवनप्रवाह आहे. ह्या प्रवाहात केवळ प्रवाहपतित न बनता सुजाणपणं मार्ग आक्रमत जाणं

व जगण्याचा आनंद लुटणं हा जीवनाचा एक छोटासा आदर्श माझ्यापुढं आहे. हाच माझा खराखुरा विरंगुळा!

**शब्दार्थ व टिपा :**

**विरंगुळा**–मन रिझवणारी गोष्ट; मनोरंजन. **धकाधकी**–दगदग. **मनमुराद**–मनाला हवे तेवढे; भरपूर; मनसोक्त. **ठेवा**–मूल्यवान वारसा. **लेणे**–पाषाणात कोरलेल्या आकृती, मूर्ती, चित्रे इत्यादी असणारी गुहा. **और**–अगदी वेगळा; विशेष; अपूर्व. **लहडलेली**–लगडलेली, – भरपूर फुले, फळे लागलेली.

**प्रवाहपतित बनणे**–परिस्थितीबरोबर अगतिकपणे, अनिच्छेने वाहत जाणे.

**प्रीतिसंगम**–कऱ्हाडला ज्या ठिकाणी कृष्णा आणि कोयना या नद्या एकत्र मिळतात, ते ठिकाण 'प्रीतिसंगम' नावाने ओळखले जाते. **मॅक्झिम गॉर्की**–जगप्रसिद्ध रशियन कादंबरीकार. **कैलास लेणे**–वेरूळजवळच्या लेण्यांच्या समूहातले सर्वांत मोठे आणि अतिशय सुंदर असे पाषाणमंदिर. **बालगंधर्व**–एके काळी मराठी रंगभूमीवर स्त्रीभूमिका करणारे विख्यात रूपसुंदर गायक नट.

**प्रश्न :**

१. प्रीतिसंगमावर गेल्यावर लेखकाला कोणता अनुभव आला?
२. लेखकाला एकान्तात आनंद कशाकशांतून मिळतो?
३. समूहाबरोबर कोणकोणत्या गोष्टी लेखकाला विरंगुळा देतात?
४. चांगली पुस्तके वाचली की कोणता अनुभव येतो, असे लेखकाने म्हटले आहे?
५. वेरूळची लेणी पाहून झालेला आनंद लेखकाने कोणत्या शब्दांत व्यक्त केला आहे?
६. गंभीर गोष्टींकडेदेखील हसऱ्या चेहऱ्याने पाहावे असे लेखकाला का वाटते?
७. लेखक 'खरं जगणं' कशाला म्हणतो?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'स्वप्न' या शब्दापासून 'स्वप्नाळू' हा शब्द तयार झाला आहे. पुढील शब्दांपासून असे शब्द तयार करा—माया, झोप, श्रद्धा, कणव, विसर.
२. 'जुन्यापासून बोध आणि नव्याचा शोध घेत जाणारा हा मानवी जीवनप्रवाह आहे,' हे या पाठातील एक सुभाषितवजा सुंदर वाक्य आहे. अशी आणखी वाक्ये या पाठात आहेत. ती शोधा आणि वहीत टिपून ठेवा. त्यांपैकी एका वाक्यासंबंधी अर्थ स्पष्ट करणाऱ्या पाच-सहा ओळी लिहा.

* * *





# १३ सहकारमहर्षी विखे-पाटील

**भालचंद्र फडके**

**भालचंद्र दिनकर फडके** (जन्म: १९२५) मराठी साहित्याचे रसिक समीक्षक. सामाजिक व शैक्षणिक विषयांवरील लेखन. 'दलित साहित्य : वेदना व विद्रोह', 'मराठी लेखिका: चिंता आणि चिंतन', 'कथाकार खानोलकर' इत्यादी त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

पहिला सहकारी साखर कारखाना प्रवरानगर येथे पद्मश्री विठ्ठलराव विखे-पाटील यांनी सुरू केला. शेतकऱ्यांच्या कल्याणासाठी शेतकऱ्यांनीच सुरू केलेल्या ह्या कारखान्याचे कौतुक पं. नेहरू यांनी केले. श्री. विखे-पाटील यांच्या गुणविशेषांची व कार्याची या उताऱ्यात ओळख करून दिली आहे.

**विठ्ठलराव** घरी परतत होते तेव्हा चांगलाच काळोख झाला होता. आज त्यांचे मन अस्वस्थ झाले होते. मन अस्वस्थ असले की ज्ञानोबा-तुकोबांच्या ओळी ते गुणगुणत. थोडा वेळ थांबून त्यांनी मागे वळून पाहिले – वडलार्जित जमिनी, त्यांतली उभी पिके, गडीमाणसांच्या खोपटांतील पेटलेल्या चुली, अंग शहारून टाकणारा वारा हे सगळे पाहता पाहता दुपारचा प्रसंग एकसारखा त्यांच्या डोळ्यांसमोर येत होता.

घरून आलेल्या चटणीभाकरीचा काही भाग त्यांनी राखण करणाऱ्या गड्याला दिला, तेव्हा तो काही खाईना. फार आग्रह केल्यावर तो म्हणाला, ''मायबाप, कसं खाऊ? हैत घरी दोन पोरं बारकी.उपाशीच हैत कालच्यापसनं. भाकरी भाकरी करून रातच्याला तशीच झोपली...तवा ही बांधून घेतो.'' त्याचे बोलणे ऐकता ऐकता विठ्ठलरावांचे डोळे पाण्याने डबडबले. मग सगळीच चटणी-भाकरी त्यांनी त्याच्या हवाली केली. काकुळतीने गडी म्हणाला, ''मायबाप, सगळंच दिलासा की!''

विठ्ठलराव म्हणाले, ''होय, मी पुन्हा घरून मागवीन. कष्ट करणाऱ्याचं भांडवल म्हणजे शरीर. बाबा, पोटाला काहीतरी असलं तरच हात चालणार, न्हवं?''

असाच दुसरा एक प्रसंग. वसुलीसाठी आपली आडदांड माणसे घेऊन सावकार आला होता. त्यांना बघून शिवा मुलाबाळांच्या, देवाधर्माच्या शपथा घेऊन विनवत होता, 'मायबाप, जरा सवड द्या. ह्या सुग्गीला सगळं कर्ज चुकतं करतो. काही बाकी ठेवत नाही.' पण सावकाराच्या हृदयाला कुठला पाझर फुटणार! त्याचे काहीच न ऐकता दोन बलदंड माणसे पुढे झाली.त्यांनी खोपटा-समोरच्या गाडग्या-मडक्यांवर लाथा मारून ती फोडून टाकली. खोपटे उचकटले. शिवाला धरून बेदम झोडपले. बघ्यांनी गर्दी केली होती; पण कोणी पुढे येईना. त्या गर्दीत विठ्ठलरावही होते. पण हा जुलूम त्यांना असहायपणे बघावा लागला. ती असहायता विठ्ठलरावांना अस्वस्थ करत होती. जिवाची उलघाल चाललेली. ठिकठिकाणी हेच बघायला मिळत होते. त्यांच्या मनात अनेक विचार येत होते — यावर उपाय काय? गोरगरिबांच्या माना मोडणारा

सावकार कसा हटवायचा? कसा?...हे सगळं बदलायला हवं. त्यासाठी सहकारी सोसायटी उभी केली तर!

ही कल्पना सुचताच विठ्ठलराव झपझप चालू लागले. दुरून भजनाचे सूर वाऱ्याबरोबर कानी येत होते. विठ्ठलरावांचे मन विचारात पार बुडून गेले.

सावकाराचे कर्ज, भरमसाट व्याज, जमिनीचा लिलाव. यांमुळे जमिनीचा खरा मालक कर्जापायी भूमिहीन होऊ लागला. कर्ज म्हणजे शेतकऱ्याचा शत्रू. खरे पाहिले तर, त्याचे भांडवल त्याच्या जमिनीत, गुराढोरांत गुंतून पडल्यामुळे बी-बियाणे, खते, अवजारे यांसाठी कर्ज काढण्याशिवाय त्याला गत्यंतर नाही. गरीब शेतकऱ्याला कोण मदत करणार? एकमेकांनी एकमेकांना मदत केली आणि पैसा गोळा केला तर? संत म्हणतातच, 'एकमेकां साह्य करू। अवघे धरू सुपंथ'... बस्स, ठरलं!

लोणी गावात शेतकऱ्यांची एक सोसायटी होती; पण थकबाकीदार वाढल्यामुळे ती डबघाईस आली होती. त्यांना नगरची एक सभा आठवली. कलेक्टर बोलत होते, ' सहकारी सोसायट्यांतून लोक पैसे घेतात. ते वेळेवर परत करत नाहीत. ते कर्जबाजारी होतात. त्यामुळे सरकारचे पैसे बुडतात. ही सहकारी चळवळच बंद केली पाहिजे. ' विठ्ठलराव ताडकन उठून म्हणाले, ''साहेब, थकबाकीदार वाढतात हे खरं. तुम्ही एखाद्या दवाखान्यात गेलात तर तिथं तुम्हांला सगळे रोगी दिसतात; म्हणून तुम्ही म्हणणार काय, की सगळं जगच रोगी आहे, तेव्हा दवाखाने बंद करा. सहकारी चळवळीवर राग कशाला काढता? सोसायटीचा गैरकारभार तुम्ही सुधारा ना!''

विठ्ठलरावांचे हे उद्‌गार ऐकून कलेक्टर वरमले. विठ्ठलराव विखे-पाटील म्हणजे तशी मोठी असामी. लोणी व आसपासच्या परिसरात त्यांच्याविषयी लोक आदराने बोलत. शेती किफायतशीर व्हायची असेल, तर शेतकऱ्यांची नड भागवली पाहिजे, खत, बी-बियाणे पुरवले पाहिजे, पाटाचे पाणी दिले पाहिजे, असे ते सांगत. गावोगावच्या गटांतील जे हेवेदावे होते ते त्यांनी चार समजुतीच्या गोष्टी सांगून मिटवले होते. त्यामुळे त्यांचा शब्द कुणी खाली पडू देत नसे.

विठ्ठलरावांचा वेश किती साधा! पांढरे स्वच्छ धोतर, अंगात खमीस,

डगळ कोट, वर उपरणे, डोक्याला पटका, पायांत जोडा आणि हातात छत्री असा त्यांचा जामानिमा. लोकांच्या चिंतांची ओझी वाहत ठेंगण्या घोडीवरून फेरफटका करायचा, नाहीतर पदयात्रा करायची. दुसऱ्या कोणाचे अन्न खायचे नाही. फडक्यात बांधलेली घरची भाकरी जवळ असायची. एकदा ते दिल्लीला पंडित नेहरूंच्या घरी गेले होते. तेव्हाही त्यांनी पंडितजींना सांगितले, ''मी चटणी-भाकरी बांधून आणलीय.''

विचार करता करता त्यांच्या मनात आले—आपल्या नगर जिल्ह्यात सहा साखर कारखाने निघाले. शेतकऱ्यांच्या उसाची साखर तयार करून धनिक मंडळी लाखो रुपये नफा मिळवतात. साखर कारखाना म्हणजे त्यांनी वाहत्या पैशाचे शेत बनवले होते; पण घाम गाळून शेत पिकवणारा मात्र उपाशीच राहिला होता. सहकारी सोसायटी काढली तर आपला शेतकरी सावकारी पाशात सापडणार नाही.

विठ्ठलरावांनी शेतकऱ्यांना जागवायला सुरुवात केली. मैल न् मैल पायपीट करत ते शेतकऱ्यांच्या भेटी घेत. त्यांच्या सभा घेत. त्यांच्याशी चर्चा करत. त्यांना म्हणत, ' बाबांनो, दिवसभर घाम गाळता, पण हाती काही पैका लागत नाही. सगळे एकत्र येऊ, पैसा जमा करू. त्या पैशातून कारखाना उभा करू. साखरेच्या धंद्यात बक्कळ पैसा, पण सर्वांनी एकदिलानं काम करायला पाहिजे.' काहीजण ऐकत, काहीजण टिंगल-टवाळी करत; पण विठ्ठलराव कधी खचून गेले नाहीत. धनंजयराव गाडगीळ व वैकुंठभाई मेहता यांच्याबरोबर ते सल्लामसलत करत.

१७ डिसेंबर १९४५ ला शेतकऱ्यांची सभा झाली. त्या सभेत सहकारी साखर कारखाना उभा करायचा ठराव मंजूर झाला. सहकारी कारखान्याचे शेअर्स खुद्द खातेदार असणाऱ्या जमीनमालकांनाच घेता येतील असे कलम ठरावात घातले. हेतू हा, की कारखान्याची मालकी कसणाऱ्या शेतकऱ्यांच्या हाती यावी. विठ्ठलराव म्हणाले, ''माझ्या बंधूंनो, एकोपा आणि एकमेकांचं सहकार्य यांच्या जोरावर आपण काम करू. तुमच्या-आमच्या श्रमातून कारखाना उभा करू आणि जो फायदा मिळेल तो सर्वांत सारखा वाटून घेऊ.''

विठ्ठलराव व त्यांचे सहकारी कामाला लागले. अडचणींचा डोंगर उभा राहिला; पण कुणीच धीर सोडला नाही. सहकारी चळवळ हाच राष्ट्राच्या उन्नतीचा एक आधार आहे.

एखादा कुचेष्टने विचारी, ''काय पाटील? फॅक्टरी काढणार ना? मग किती हजार गोळा केलेत?'' पाटील शांतपणे म्हणत, ''हजारात फॅक्टरी होते काय? लाखांवर रुपये लागतात. आम्ही शेतकऱ्यांनी पै-पै करून पैसे जमवलेत. आम्ही आता मागं फिरणार नाही.''

शेतकरी एकत्र येऊन लाखांवर पैसा गोळा करतील,हे अनेकांना शक्य वाटत नव्हते; पण विठ्ठलरावांनी ते शक्य करून दाखवले. लोणीजवळच्या माळावर हळूहळू फॅक्टरी उभी राहिली. २५ नोव्हेंबर १९५० रोजी बॉयलर प्रज्वलित झाला. बरेच दिवस उराशी बाळगलेले विठ्ठलरावांचे स्वप्न साकार झाले. भारतातल्या पहिल्या साखर कारखान्याची मुहूर्तमेढ रोवली ती विखे-पाटलांनी!

दहा वर्षांत प्रवरानगर साखर कारखाना भरभराटीला आला. आजूबाजूच्या परिसरात वातावरण बदलू लागले. जे भूमिहीन होते ते भूमिधारक बनू लागले. जे शेतकरी कर्जबाजारी होते, ते कारखाना आल्यामुळे हळूहळू कर्जमुक्त झाले. त्यांच्या हातात पैसा खेळू लागला. अंगभर कपडा ल्यायला मिळू लागला. छोटी छोटी चांगली घरे दिसू लागली. शेतात पाणी खेळू लागले. जिकडेतिकडे हिरवेगार उसाचे फड दिसू लागले. कुठे कुठे ट्रॅक्टर नांगरणी करू लागले. पत-पुरवठा सहकारी सोसायटी, खते-बीबियाणे-अवजारे यांचा पुरवठा करणारी दुकाने, शाळा, दूध-उत्पादक संघ, खरेदी-विक्री संघ, यंत्राचे सुटे भाग तयार करणारी उद्योगकेंद्रे अशा विकासाच्या अनेक खुणा दिसू लागल्या.

१५ मे १९६१ चा तो दिवस! कारखान्याचे मैदान लाखो शेतकऱ्यांनी फुलून गेलेले. पंतप्रधान पंडित नेहरू कारखान्याची व पिकांची पाहणी करून व्यासपीठावर आले. पंडित नेहरूंच्या जयजयकाराने वातावरण दुमदुमून गेले. पंडितजींच्या पाठोपाठ विखे-पाटील आले तेव्हा टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला.

पंडितजी म्हणाले, "'पद्मश्री' स्वीकारण्यासाठी विखे-पाटील भारताच्या राजधानीत आले होते; पण आज मी विखे-पाटलांच्या राजधानीत आलो आहे! विद्वान आणि धनिक माणसं मोठमोठी कामं तडीस नेतात; परंतु कमी शिकलेली सामान्य माणसंही तितकंच मोठं काम करू शकतात. स्वातंत्र्य मिळालं. आता दारिद्र्याशी लढाई सुरू केली आहे, त्यासाठी श्रमाची व सहकार्याची गरज आहे. विखे-पाटील हे खरे देशभक्त आहेत. जमीन ही त्यांची माउली आणि ते तिचे लाडके पुत्र!"

आपल्या कार्याने आणि कर्तृत्वाने शेतकऱ्यांच्या मनाच्या विटेवर विठ्ठलरावांची मूर्ती कायम उभी आहे.

**शब्दार्थ व टिपा:**

**वडलार्जित**–वाडवडलांनी मिळवलेली. **बलदंड**–शक्तिशाली. **भूमिहीन**–ज्याच्याजवळ स्वतःची जमीन नाही अशी व्यक्ती. **वरमणे**–लाज वाटणे; ओशाळणे.

**किफायतशीर**–फायदेशीर. **शेअर**–भाग-भांडवल.

**हात चालणे**–काम करणे. **हृदयाला पाझर फुटणे**–दया येणे. **शब्द खाली पडू न देणे**–जे सांगितले जाईल ते तत्परतेने करणे. **घाम गाळणे**–खूप कष्ट करणे. **गत्यंतर नसणे**–दुसरा उपाय नसणे. **मुहूर्तमेढ रोवणे**–शुभकार्याचा आरंभ करणे. **उधाण येणे**–ओसंडून वाहणे. **तडीस नेणे**–पूर्ण करणे.

**बॉयलर**–उष्णतेने वाफ निर्माण करून यंत्र चालवण्यासाठी उपयुक्त असलेली धातूची टाकी. **धनंजयराव गाडगीळ**–अर्थशास्त्रज्ञ. सहकारी चळवळीचा पाठपुरावा करणारे विचारवंत. **वैकुंठभाई मेहता**–सहकारी चळवळीचा आधार असलेले कार्यकर्ते.

**प्रश्न:**

१. विठ्ठलरावांचे शेतकरी बंधूंवर अतोनात प्रेम होते हे, कोणत्या प्रसंगांतून दिसून येते?
२. मिळालेली चटणी-भाकरी शिवाने बांधून का घेतली?
३. सहकारी साखर कारखाना स्थापन करण्याची कल्पना विठ्ठलरावांना कोणत्या कारणांमुळे सुचली?
४. साखर कारखान्याच्या उभारणीसाठी विठ्ठलरावांनी कोणते प्रयत्न केले?
५. 'सहकारी चळवळीवर राग का काढता', हा प्रश्न त्यांनी कोणाला विचारला? का?
६. 'मी विखे-पाटलांच्या राजधानीत आलो आहे!' असे पंडित नेहरू कोणत्या अर्थाने म्हणाले?

**स्वाध्याय व उपक्रम:**

१. हृदयाला पाझर फुटणे, मुहूर्तमेढ रोवणे, शब्द खाली पडू न देणे, उधाण येणे या वाक्प्रचारांचा उपयोग करून वाक्ये लिहा.
२. 'गैरकारभार' या शब्दात कारभार या शब्दापूर्वी 'गैर' हा शब्द आला आहे. 'थकबाकीदार' या शब्दात 'दार' हा शब्द 'थकबाकी' या शब्दानंतर जोडला आहे. अशा प्रकारचे शब्द मिळवा व ते लिहा.
३. 'रातच्याला' म्हणजे 'रात्री', 'दिलासा' म्हणजे 'दिलेत'. आपल्या भागातील ग्रामीण बोलीतील शब्दांची रूपे समजून घ्या आणि ती वहीत लिहून ठेवा.
४. एकमेकां साह्य करू... यासारखी सुवचने जमवा व ती सुवाच्य अक्षरांत लिहून वर्गात लावण्यासाठी नक्षीदार पट्ट्या तयार करा.
५. जवळच्या सहकारी साखर कारखान्याला भेट द्या व त्यामुळे आजूबाजूच्या परिसरात कोणते नवे बदल घडून आले आहेत याची माहिती घ्या.

* * *



# १४ आम्ही बंगाली शिकलो !

## रमाबाई रानडे

**रमाबाई महादेव रानडे** (जन्म: १८६३; मृत्यू: १९२४) प्रसिद्ध सामाजिक कार्यकर्त्या. न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांच्याशी विवाह झाल्यानंतर रमाबाईंनी शिक्षण घेतले. पतीच्या प्रेरणेने समाजसेवेचेही धडे त्यांनी गिरवले. पुणे येथील 'सेवासदन' या स्त्रियांच्या शिक्षणसंस्थेशीही त्यांचा जवळचा संबंध होता.

'आमच्या आयुष्यातील काही आठवणी' हे त्यांचे आत्मचरित्रात्मक पुस्तक. त्यातून हा उतारा घेतला आहे. न्यायमूर्ती रानडे यांना आपल्या नोकरीच्या निमित्ताने काही दिवस बंगालमध्ये जावे लागले. तिथे गेल्यावर बंगाली भाषा शिकण्याची आवश्यकता का वाटली आणि ती शिकण्यासाठी त्यांनी कसे प्रयत्न केले, हे या पाठात वाचा.

**आम्ही** कलकत्त्यास आलो. धरमतोळ्यावर एक भाड्याचा बंगला घेऊन राहिलो. हा बंगला फार मोठा होता, पुष्कळ जुना असून आवारात विहीर, बाग, झाडंझुडपं इत्यादी काही नसल्यानं तो अगदी उजाड-ओसाड दिसे. दिवस फार कंटाळवाणा वाटे. संध्याकाळी स्वतः घरी आल्यावर विचारलं, ''आज काय काय केलंस?''

मी जरा कंटाळल्यासारखं म्हटलं, ''काही केलं नाही, करावयाचं काय? आधी जागा नवी, कोणाची ओळख नाही. बंगला म्हणून जो घेतला आहे, तोतरी मन रमण्यासारखा असावा, तर तेही नाही. झाडं, फुलं, वेली यांतही मनुष्याचं मन काही वेळतरी रमतं; पण त्यांपैकी इथं काहीच नाही. उलट जिकडं पाहावं तिकडं भणभणीत व ओसाड. घरातसुद्धा काही करण्यास मन लागत नाही. बरं, भाडं तरी थोडं आहे! तेही पुष्कळच. बाहेर जाणाऱ्या माणसाचं ठीक आहे; पण घरात राहणाऱ्या माणसांचा दिवस उदास, कंटाळवाणा जातो.''

हे सर्व बोलणं ऐकून घेऊन शांतपणे उत्तर दिलं, ''खरं आहे. वाचनासारखं साधन ज्याच्यापाशी आहे, त्यानं अशी कुरकुर करू नये. वाचनाइतकं समाधान

व आनंद देणारं दुसरं काही नाही. एका जातीच्या पुस्तकाचा कंटाळा आला तर दुसरं पुस्तक घ्यावं. कविता वाचाव्यात. फार वाचून मन थकलं तर दुसरीकडं बागबगीचे पाहण्यास जावं. तुला काय साधन नाही? गाडी जोडून फिरावयास जावं, म्हणजे थकलेल्या मनाला विश्रांती मिळते. तुझ्या मनालाच काहीतरी काम देतो, म्हणजे झालं. उद्या तू या ओसाड दिसणाऱ्या जागेला शोभा आणण्याचं मनात आण.''

हे ऐकून मला हसू आलं. मग मी म्हटलं, ''नुसतं मनात आणून जागेला शोभा कशी येईल?''

यावर स्वतः म्हटलं, ''मी आधी काय म्हणतो ते ऐकून घे. उद्या सकाळी चार मजूर लावून तुला जेवढी बाग करावयाची असेल, तेवढी जागा आखून देऊन त्यांच्याकडून खणून घे व त्यात वाफे करून मेथी, कोथिंबिरीचं बी टाक. शिवाय, या ऋतूमध्ये येणाऱ्या फुलझाडांचं थोडंसं बी आणून टाक. म्हणजे करमणूक व उपयोग दोन्हीही होतील. या बागेला पाणी तू घालीत जा. म्हणजे अनायासे व्यायाम होईल. मी घरी आल्यानंतर संध्याकाळचं वाचन या तुझ्या बागेतच आपण करू.''

दुसऱ्या दिवशी मला उठल्याबरोबर त्याची आठवण दिली. मीही सांगितल्याप्रमाणं मजूर बोलावून आणून संध्याकाळपर्यंत काम करून घेतलं. संध्याकाळी स्वतः घरी आल्यावर आम्ही गाडीतून फिरावयास गेलो व येते वेळी फुलझाडांचं थोडंसं बी घेऊन आलो. पुढं एकदोन दिवसांनी या नवीन केलेल्या बागेत खुर्च्या टाकून संध्याकाळी वाचत बसलो. इतक्यात एक वर्तमानपत्र वाटणारा मनुष्य आला व ''वर्तमानपत्र सुरू करायचं आहे काय?'' असं विचारू लागला.

मी घाईनं म्हटलं, ''बाबा रे, आम्हांला पत्र नको. बंगाली वाचता येत नाही. मग उगीच पत्र कशाला घ्यायचं?''

त्या मनुष्यानं माझ्या बोलण्याकडं लक्ष न देता स्वतःकडं पाहून पुन्हा विचारलं, तेव्हा त्याला सांगितलं, ''आज आणलेलं पत्र असू दे. उद्यापासून आणू नको. पुढल्या सोमवारी घेऊन ये. मग सुरू करू.''

हे ऐकून मला जरा चमत्कारिक वाटलं; पण मी गप बसले. तो मनुष्य निघून गेल्यावर **स्वतः** माझ्याकडं पाहून म्हटलं, ''ज्यांच्या गावात येऊन चार-दोन महिने राहयचं, त्यांची भाषा आम्हांला समजत नाही असं म्हणायला मला तर लाज वाटली असती!''

मी म्हटलं, ''जी आपली भाषा नाही, ती येत नाही म्हणायला लाज कसली? आता यापुढं शिकायचं मनात आणलं तर ते जमावं कसं आणि शिकवणार तरी कोण?''

**स्वतः**ला बंगाली अक्षरओळख मात्र होती; पण चांगलं वाचता येत नव्हतं, हे मला माहीत होतं. म्हणून मी मुद्दाम म्हटलं, ''बरं, मी शिकावं असं मनात असल्यास उद्यापासून **स्वतः** शिकवावं; माझी तयारी आहे. दुसऱ्या कुणाजवळ मात्र मी शिकणार नाही.''

हे ऐकलं तेव्हा खरं म्हणजे नेहमीप्रमाणं काहीतरी थट्टेनं बोलायचं; पण आज मात्र काही न बोलता विचार करत असलेला चेहरा दिसला. मी मनातल्या मनात अगदी ओशाळले. माझ्या बोलण्याचा राग तर आला नाही ना, असं वाटलं.

तो दिवस तसाच गेला. दुसऱ्या दिवशी चहा घेतल्यावर नित्याप्रमाणं फिरायला जाणं झालं. परंतु घरी यायला नित्यापेक्षा उशीर झाला, म्हणून मी वाट पाहत बसले होते. इतक्यात येणं झालं. बरोबर एक शिपाई होता. त्याच्या हातात लहानमोठी अशी दहा पुस्तकं होती. ती त्यानं टेबलावर ठेवली. मी जवळच उभी होते. त्यांतून एकदोन पुस्तकं उघडून पाहिली, तो ती बंगाली व इंग्रजी होती. 'ही पुस्तकं कशाला आणली?' असं माझ्या तोंडातून निघणार, तोच आदल्या दिवशीची आठवण होऊन मी गप्प बसले. तोच सांगितलं, ''तेवढी मोजून घेऊन या मनुष्याला चिठ्ठीप्रमाणं पैसे देऊन टाक बरं.''

मी 'होय' म्हणून लागलीच चिठ्ठीप्रमाणं बुकं मोजून घेऊन पैसे देऊन टाकले. मग दूध आणून दिलं. ते पिऊन झाल्यावर टेबलावरचं एक बुक घेऊन ते **स्वतः** चाळण्यास आरंभ केला. मी त्या दिवाणखान्यात दूर एका खुर्चीवर कांहीतरी वाचीत बसले होते. पण मधूनमधून काय चाललं आहे ते पाहत होते.

कारण इतकी पुस्तकं व ती **स्वतः** जाऊन खरेदी केली याचा उद्देश माझ्या ध्यानात येईना. **स्वतः** बाजारात जाणं किंवा जिन्नस खरेदी करणं कधीच माहीत नव्हतं. साऱ्या जन्मात **स्वतः** बाजार करण्याचा हा पहिलाच प्रसंग. मुळी पैसा हातात घ्यावयाचा नाही व जवळ बाळगायचा नाही, हा मुख्य नियम!

अकरा वाजेपर्यंत पुस्तकं चाळणं झालं. काही पुस्तकं वाचण्याचा प्रयत्न केला, पण शिकून बरेच दिवस झाल्यामुळं विसर पडला होता. त्यामुळं अक्षरं लागेनात असं दिसलं. अकरा वाजता 'स्वयंपाक तयार आहे,' असं म्हटल्यावर स्नानास उठणं झालं. जाता जाता शिपायाला सांगितलं, ''मी जेवून परत येईपर्यंत तू बाजारात जाऊन एक स्लेटपाटी व पेन्सिल घेऊन ये, वेळ लावू नको.''

जेवण होऊन दिवाणखान्यात आल्यावर आणलेली पाटी हातात घेतली व त्या पुस्तकांपैकी एक पुस्तक हातात घेऊन पाटीवर मुळाक्षरं काढण्याचा क्रम सुरू केला. तोपर्यंत नेहमीसारखं मधूनमधून काहीतरी विनोदानं, चेष्टेनं, बोलायचं; पण ते आज काहीच नाही. सगळं लक्ष नवीन पुस्तकाच्या वाचनाकडं होतं. संध्याकाळी गाडीतून फिरावयास जाण्याच्या आधी जे पुस्तक वाचावयास अडत होतं; त्यातला धडा मोठ्यानं भराभर वाचला आणि ते पुस्तक खाली ठेवलं व मगच पोशाख केला. आम्ही दोघं गाडीतून फिरावयास गेलो. इकडल्या-तिकडल्या पुष्कळ गोष्टी बोललो; पण सकाळच्या पुस्तकांबद्दल विचारण्यास मला धीर होईना. **स्वतः**च्या बोलण्यात मात्र एकदा सहज उद्गार निघाला, ''आज बंगाली वाचण्यात सगळा वेळ घालवल्यामुळं माझं रोजचं काम काही झालं नाही.''

हे ऐकून मी काहीच उत्तर दिलं नाही; पण माझं मलाच वाईट वाटलं, की माझ्या कालच्या बोलण्यानं आज इतकी दगदग पडली! बंगाली शिकण्याची टाळाटाळी करण्याकरिताच 'मला **स्वतः** शिकवलं तर मी शिकेन, दुसऱ्याजवळ शिकणार नाही,' असा माझा बोलण्याचा हेतू होता. कारण मी नुसतं 'होय' म्हटलं असतं, तर कोणीतरी एक बंगाली शिक्षक आणिला असता; पण मला ते आवडलं नाही. कारण एक तर मला लहानपणापासून शाळा ठाऊक नव्हती,



**स्वतः**शिवाय कोणत्याही पुरुषाजवळ शिकण्याचा प्रसंग नव्हता. पण **स्वतः**ला वेळ नव्हता आणि बंगाली शिकून पुष्कळ दिवस झाले होते. म्हणून शिकवण्यास कोणीतरी मनुष्य ठेवण्याची वेळ येईल, ती टाळावी या बुद्धीनंच मी आदले दिवशी बोलून गेले. माझ्या या शब्दांनी इरेस पडून दुसरा सबंध दिवस उजळणी करण्याकडं घालविला, याबद्दल मला पश्चात्ताप होऊन चोरट्यासारखं झालं.

दुसरे दिवशी सकाळी फिरावयास जाण्याच्या आधी पाटीवर बंगाली मुळाक्षरं काढून मला दिली आणि एकदोनदा वाचायला सांगून, "मी घरी येण्यापूर्वी ही अक्षरं तयार करून ठेव," असं म्हटलं. परत येईपर्यंत मी सर्व अक्षरं तयार करून पुन्हा काढून ठेवली व मगच आपल्या कामाला गेले.

**स्वतः** घरी येऊन नित्याप्रमाणं सर्व झाल्यावर हजामतीला बसले असता **स्वतः** एक बंगाली बुक हाती घेऊन मोठ्यानं वाचावयास सुरुवात केली व जो शब्द अडेल त्याची अक्षरं व उच्चार त्या नापिताला विचारावयाचे, असा क्रम चालला होता. मी जवळच्या खोलीत वाचीत बसले होते. तेथे दिवाणखान्यात दुसरं कोणी बोलत आहे असं मला ऐकू आलं. तेव्हा कोणीतरी भेटावयास आलं समजून, ते कोण आहेत हे पाहण्यास उठले व पाहते तो दुसरे कोणी आले नसून बंगाली पुस्तक हातात घेऊन **स्वतः**च मोठ्यानं वाचत होते. जवळ असलेला नापित शब्दांचे उच्चार व अर्थ सांगत होता.

अशा रीतीनं एवढ्या मोठ्या वयात आपण **स्वतः** शिकून मला शिकवण्याचा क्रम ठेवलेला पाहून मला याचं अतिशय नवल वाटलं. याप्रमाणं बंगाली वाचनाचा क्रम ठेविल्यावर महिना-दीडमहिन्यानं मला चांगलं वाचता

येऊ लागलं. बागेत मेथी व कोथिंबीर दाट उगवली असून इंग्रजी फुलझाडांना फुलं आली होती. त्या ठिकाणी खुर्च्या टाकून आम्ही बसलो असताना काही आठवड्यांपूर्वी जे बंगाली वर्तमानपत्र नको म्हटलं होतं, तेच आता सुरू करून दररोज तिथं वाचण्याचा क्रम ठेविला.

**शब्दार्थ व टिपा :**

**भणभणीत**—रखरखीत,

**इरेस पडणे**—एखादी गोष्ट करण्याची जिद्द निर्माण होणे.

**धरमतोळा**—कलकत्त्याचा एक विभाग.

**स्वत:**—हा शब्द या पाठात 'पती' या अर्थाने वापरला आहे.

**प्रश्न :**

१. 'घरात राहणाऱ्या माणसाचा दिवस उदास, कंटाळवाणा जातो,' असे रमाबाई का म्हणतात?

२. दिवस चांगला जाण्यासाठी न्यायमूर्ती रानडे यांनी कोणते उपाय सुचवले?

३. रमाबाई मनातल्या मनात का ओशाळल्या?

४. बंगाली शिकण्याची जरूरी आहे असे न्यायमूर्ती रानडे यांना का वाटले?

५. बंगाली शिकण्यासाठी रानडे यांनी कोणते प्रयत्न केले?

६. न्यायमूर्ती रानडे यांचे कोणते विशेष गुण या पाठात दिसून येतात?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. या पाठात स्त्रियांची घरगुती वळणाची भाषा दिसून येते. उदाहरणार्थ, 'संध्याकाळी **स्वत:** घरी आल्यावर विचारले.' यासारखी या पाठातील आणखी काही वाक्ये शोधा.

२. 'धीर' शब्दावर आधारलेला 'धीर खचणे' हा एक वाक्प्रचार आहे. या शब्दावर आधारलेले इतर वाक्प्रचार सांगा आणि त्यांचा वाक्यांत उपयोग करा.

३. 'घरातसुद्धा' हा शब्द 'घरातदेखील', 'घरातही' असाही लिहिता येतो. 'देखील', 'ही', 'पण,' 'सुद्धा' यांचा अशा प्रकारे उपयोग करून काही वाक्ये तयार करा आणि ती वहीत लिहा.

४. या पाठाचे नाट्यीकरण करून समारंभाच्या वेळी ते सादर करा.

५. 'रीतीने' या शब्दातील 'री' हे पहिले अक्षर दीर्घ आहे. यासारखेच इतर काही शब्द आहेत. उदाहरणार्थ भीती, कीर्ती, नीती. असे आणखी शब्द शोधून काढा आणि त्यांचे योग्य लेखन व उच्चारण करा.

* * *



# १८ आबा

## उद्धव शेळके

**उद्धव जयकृष्ण शेळके** (जन्म: १९३१) कथाकार व कादंबरीकार. 'धग', 'अगतिका' इत्यादी कादंबऱ्या. 'शिळान', 'वानगी' इत्यादी कथासंग्रह. विदर्भाच्या ग्रामीण भागातील गोरगरीब उपेक्षित माणसांचे ते सहानुभूतीने वर्णन करतात.

ही कथा 'वानगी' या कथासंग्रहातून घेतली आहे. 'आबा' हा एक शिपी. कपडे शिवून तयार करणे आणि आठवडी बाजारात ते विकणे हा त्याचा व्यवसाय. हा व्यवसाय करताना आबाला कोणकोणत्या अडचणींना तोंड दयावे लागे, हे या पाठात दिसून येते.

**ओसरीतल्या** कुडाशी उजेडाकडं तोंड करून संदूक ठेवला आहे. खुर्चीएवढा उंच. घडवंचीइतका लांबरुंद धुरकटलेला. लोखंडासारख्या रंगाचा. कोंड्यात चापट कुलपाची नथ अडकवलेला. त्या संदुकावर जुन्या चिंध्यांनी ठसठसलेली, बसून बसून चापट झालेली, दगडासारखी जड अशी कंतानाची उशी आहे. आबानं त्या उशीवर बूड जमवलं.

आता आबाची मिसन पुन्हा सुरू होईल. आणखी घटकाभर चालू राहील. ऊन जोत्याखाली उतरू लागलं, की त्याची आवरासावर सुरू होईल. प्रथम मिसनीची बाबीन काढील. लोंबकळणारा दोरा परत बंडलाला गुंडाळला जाईल. शेवटी उजव्या हाताकडची कात्री घेईल आणि सर्व सामान ड्रावरमध्ये घालील. वरच्या चाकावरची तेलकट नाडी खाली सोडली जाईल. बसायला खाली घेतलेला दुसा चांगला झटकून मिसनीच्या मुंडक्यावर झाकला जाईल. नंतर पायदांड्यावर लोंबकळणारी नाडी खालच्या चाकाला बांधली जाईल. त्यात आबाच्या गैरहजेरीत कुणी ते चाक फिरवू नये, असा आबाचा हेतू असतो.

नंतर त्यानंच शिवून संदुकाच्या डाव्या उजव्या बाजूला टाकलेले, दोरीवर लोंबकळणारे आणि पाट्यावर बोक्यासारखे पडून असलेले कपडे तो गोळा



करील. पाट्यावर ठेवून त्याच्या व्यवस्थित घड्या पाडल्या जातील. कानटोपरी एकीकडं, पिवशा दुसरीकडं, चंच्या तिसरीकडं—असं कुठं लावलं, ठेवलं जाईल. चळतीच्या चळती लावून, रचून ठेवल्या जातील. त्यांतील हाताला लागेल ती चळत मांडीवर घेऊन आबा मोजून पाहील.

बाजारला जाण्यापूर्वी तो कधीच कुणाशी भांडत नाही. कारण त्यामुळं नाट लागतो, असं त्याचं मत आहे. काढायचीच असली तर आपल्या संतापाची कसर तो बाजाराकडून परतल्यावर काढील. आता मुकाट्यानं आपल्या तयारीला लागेल.

चंच्यांवर चंच्या, पिवशावर पिवशा, झबल्यांवर झबली, कुडत्यांवर कुडती ठेवली जात आहेत. सर्वांत शेवटी गठ्ठ्यावर तांब्या, गंज-गिलास ठेवले जातील, चादर गुंडाळली जाईल, गाठी मारल्या जातील. तोवर बाजाराला जाण्याची वेळही होईल.

वेळ झाली की आबा गठ्ठा पाठीवर टाकील. त्याची गाठ उजव्या खांद्याला अडकलेली असेल. तोवर ओसरीतल्या रवरी वहाणा आबाच्या

पायांत गेल्या असतील. त्यानं हातात एक काठी घेतलेली असेल. काठी टेकत टेकत आबा जोत्याच्या ओबडधोबड पायऱ्या उतरेल, वाटेला लागेल. वाटेत लहान लहान दोन गाव, लागतील. मग मोठ्यानं साद घालील—'पायजे कोनाले चंच्या, पिवशा, झबले, कानटोपरेऽऽ'.

कुणी हाकाळलंच तर दारात गठ्ठा सोडला जाईल. नाहीतर हातातली काठी तशीच पुढं पुढं टेकत राहील. असा आबा ऐन बाजारच्या वेळी शेंदुर्जन्याला पोचेल. तिथं एखादी रिकामी जागा पाहून आबा काठी जमिनीवर आपटील. तेवढ्यात कधी डावीकडचा तर कधी उजवीकडचा दुकानदार म्हणेल, "बुढ्या, तिथं नोको मांडून आपलं दुकान."

आबा ऐकल्या न ऐकल्यासारखं करून आपला गठ्ठा सोडू लागेल. मग दुकानदाराचा आवाज उंचावेल, "मी काय मंतो?"

सारं काही माहीत असल्यागत नि दुकानदारकडं न बघता विचारील, "का बा गा?"

"हे जागा, नारायण शिप्याची आये!"

"त्यानं इकत घेतली का?" असं म्हणून आबा बेफिकिरपणं गठ्ठ्यातील चळ्ळी काढील. मांडत राहील. छपारावरील कौलासारख्या उतरत्या.

आबाचं दुकान मांडून अर्धाएक घंटा झाला असेल नसेल, तो नारायण तिथं एक गठ्ठा घेऊन हजर होईल. आबाच्या दुकानाशी गठ्ठा लावून तो म्हणेल, "का गा, तू इथं कसा बसला?"

आबा आवाज चढवून म्हणेल, "मंजे?"

"मंजे काय, हे जागा माई होय!"

"असंन!"

"असंन नाही... उचल इथून दुकान!"

आबा बिथरून म्हणेल, "ब्राप्पा, डोये काढते का गा?"

"बसला का बा माह्या जागेवर?"

"नाव लेहतं आये का तुहं?"

"आता उचलतं का नाई दुकान, मुकाट्यानं इथून? आ!"

तरीही आबा न डगमगता म्हणेल, ''नाई!''

''फेकून देयीन!''

''फेक बरं!''

त्याचा नाइलाज होईल. मग वातावरण इथवर आलं, की तिसऱ्याच एखादया दुकानदाराला मध्यस्थी पत्करावी लागेल.

''जावू देनं गा नारायण. इथं मांड. मी सरकतो थोडंसा. बुढेबुवाई सरकवतीन आपलं दुकान थोडंसं त्या काठी.''

एवढं आबाला मानवेल.

बाजार चांगला भरलेला असेल, डोक्यावर टोपलं, काखेत मूल, सोबत नवरा, त्याचं बोट धरलेलं दहा-अकरा वर्षांच नागवं मूल—असं एखादं कुटुंबच आबाच्या दुकानापुढं येऊन ठाकलं असेल. बायको पिशवी बघत असेल किंवा काखेतल्या मुलासाठी आंगडं-टोपरं किंवा नवऱ्यांचं बोट धरणाऱ्या मुलासाठी चड्डी बघत असेल. दोनचार चड्ड्या उचलून पाहील. आणखी एकदोन चड्ड्यांतून गिऱ्हाइकानं एक निवडली असेल, किंमत विचारील, ''का गा, काय द्या लागते इचं?''

आबा चड्डीच्या कपड्याकडं बघेल, चेहऱ्यावर कौतुक चमकवीत भोळ्या गिऱ्हाइकाला चढवेल, ''याल्ले मंते, कपड्याची पारख! पांघरुनाची पारख करावी त अश्शी! काजे, मयखाऊ आन् टिकालेई मजबूत. एक पांघरून तीन-साडेतीन वर्से बिनघोर वापरून घ्यावं. आन किमतीतई सस्त!''

''काय द्या लागते, थे त सांग!''

''देजो चार रुपये!''

त्याची बायको म्हणेल, ''एक रुपया देतो!''

''एकई रुपया कायले देतं माय माझे! जानं घेऊन तशीच. मी समजन, का माह्या नातानंच फाडली एक चड्डी!''

हे सारं ऐकायसाठी गिऱ्हाईक थांबणार नाही. तेव्हा आबाही निर्वाणीनं विचारील, ''आता खरंच सांग, तुले पांघरून घ्याचं आये का?''

''मंग घ्याचं असं ना तं?''



आबा विचारील, "तीन रुपये देतं?"

तो चालत असे. आबाच म्हणेल "अडीच?"... "दोन?"

"नाई."

"जाय मंग! पहात बस भाव साऱ्या बाजारात." परवडत असल्यास आबा म्हणेल, "आन् काहाड, दीडच रुपया काहाड! कर तुझ्याच हातची बोहनी!" आणि आबा अशाच तऱ्हेनं दिवसभर गिऱ्हाइकी करत राहील. प्रत्येक गिऱ्हाइकला "कर, तुझ्याच हातची बोहनी कर!" असं म्हणत राहील.

बाजार ओसल्यावर आबा त्या गावच्या चावडीची वाट धरील. तिथं जाण्यापूर्वीच त्यानं कुठून तरी दाळ-तांदूळ विकत घेतले असतील. तीन दगड धुंडाळून काढील. त्याची चूल मांडली जाईल. चुलीवर खिचडी शिजत राहील. ती शिजवल्यावर तो अंधारातच सपासप खात बसेल. त्याची झोप फारच सावध असेल. कुत्र्याचं धडपडणं जरी एकू आलं तरी आबा जागा होईल. कोटाच्या खिशावर अन् गठ्ठ्यावर हात देऊन आबा अंधाराला म्हणेल, "कोन हाय?"

अशा तीन रात्री जातील. तीन बाजार होतील. आबाचा गठ्ठा रोडावेल.

खिसा जडावेल. मग आबानं परस्पर उमरावतीचा रस्ता धरला असेल. मोठमोठी दुकानं न्याहाळत भटकेल. दुकानदारानंच त्याची चौकशी केल्यावर विचारील, ''रेजगीर आये काय?''

''होय.''

दाखवा बरं!''

रेजगीर पाहिल्यावर आबा म्हणेल, ''काय द्या लागते याचं?''

''दहा रुपये.''

आबा दचकल्यागत गठ्ठा, काठी सावरेल. मग म्हणेल, ''अवो, आये काय त्यांच्यात! हातभऱ्याचा तुकडा पाऊन कहाडतो मनलं त सापडणार नाई!''

''बरं. सात रुपये देऊन टाका.''

''नाईबा. पुरत नाई.''

''तुम्हीच आता सांगा, केवढ्याला घ्यायची आहे, ते.''

''एकच जबान! तीन रुपये देऊ का या तुकड्याईचे?''

''काहीतरीच!''

'' रायलं.''

आबा चार पावलं चालल्यासारखं करून परतेल, म्हणेल ''साडेतीन देऊ?''

''नाही!''

आबा अजिजीनं म्हणेल, ''तुमी लोकं आमां गरिबाले पोटं ना भारू देत. अओ, आये काय थ्या चिंध्याईत!''

दुकानदार पुन्हा एकवार त्या तुकड्यांतून हात फिरवील. म्हणेल, ''साडेचार देऊन टाका.''

आबा फतकल मांडून म्हणेल, ''असं करा, आठ आने तुमी उतरवा, आठ आने मी चढवतो. टाका देऊन.''

आबा रेजगीर सावडू लागेल. दुकानदार म्हणेल, ''नाही जमत हो!''

''सारं जमतं. या वक्ताची कसर पुढं काहाडून घे जा. आयका माह्या गरिबाच्या मनचं.''

दुकानदार नाहीच वठला तर आबा थोडे पैसे वाढवेल. त्याची कबुली मिळवेल; पण तेव्हा आबाच्या मुद्रेवर नापसंती मावत नसेल.

काठी टेकत टेकतच आबा घराचा जोता चढेल. ओसरीवर गठ्ठा आदळेल. प्रथम संदुकाकडं, कडीकुलपाकडं न्याहाळून पाहील. मग मिसनीकडं, चाकाला बांधलेल्या नाडीच्या गाठीकडं, मुंडक्याला गुंडाळलेल्या ढुशाकडं. सगळं जिथल्या तिथं असल्यास समाधानाचा श्वास सोडील. मग जवळपास कुणी नसल्याची खात्री करून घेईल. संदूक जागचा बाजूस सारला जाईल. त्याखालची फरशीच्या तुकड्याची चीप बाजूला सारताच जमिनीला एक भोक दिसेल. ते रुपायाच्या आकाराचं, लांबोळतं असेल. त्यात आबा आता काही नाणी सोडेल. त्यांच्या आवाजागणिक आबाच्या मुद्रेवर समाधानाची पुटं चढतील.

जेवण झाल्यावर आबा विश्रांती घेत लोळणार नाही. गठ्ठा सोडेल. रेजगिरीचे तुकडे मांडीवर लावत बसेल. प्रथम सर्वांत मोठे, मग त्यांहून लहान, शेवटी वीतदीडवितीचे. नंतर कशांतून कुडती, कशांतून चड्ड्या, उरलेल्या बारकांतून पिवशा, कानटोपरी वगैरे. ज्यात जे बसेल त्यांतून ते कपडे कापले जातील. मग मिसनीवरचा ढुसा काढला जाईल. पूसपास होईल. बाबीन—दोऱ्याचं बंडल बसवलं जाईल. दोन्ही चाकांवर पट्टा चढेल. मिसन सुरू होईल. ती अशीच हप्त्यातून तीन दिवस चालत राहील.

**शब्दार्थ व टिपा :**

**संदूक**– मोठी पेटी. **कंतान**–गोणपाट. **मिसन**–शिवण्याचे यंत्र. **ढुसा**–सुती पांघरूण. **पिवशी**–पिशवी. **गंज-गिलास**–उभट पेला. **हाकाळणे**–हाक मारणे. **निर्वाणीचे**–अखेरचे. **रेजगीर**–कापडाचे उरलेसुरलेले तुकडे. **सावडणे**–निवडून गोळा करणे.

**बूड जमवणे**–मांडी घालून बसणे. **नाट लावणे**–अपशकुन करणे. **कसर काढणे**–एकीकडे झालेली कमतरता दुसरीकडे भरून काढणे.

**शेंदूर्जना**–अमरावती जिल्हयातील एक गाव. **बोहनी**–दिवसाची पहिली विक्री. त्यावरून दिवसभर धंदा चांगला होईल असे व्यापारी मानतात.

**प्रश्न :**

१. आबाची परिस्थिती त्याच्या दुकानातल्या कोणकोणत्या गोष्टींवरून दिसून येते?
२. आपल्या गैरहजेरीत आपल्या वस्तू सुरक्षित राहाव्या याकरिता आबा काय काय करतो?
३. बाजारात दुकानासाठी मोक्याची जागा पटकावण्याकरिता तो कोणती युक्ती करतो?
४. विक्री ही एक कला आहे. आबा या कलेत निपुण होता, हे कोणत्या प्रसंगातून दिसून येते?
५. आबाला खरा आनंद केव्हा होतो?
६. कष्टाळूपणा, सोशिकपणा, चिकाटी, काटकसरीपणा हे आबाच्या अंगचे गुण सूचित करणारे शब्द किंवा वाक्ये शोधा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. ''बाजार ओसरल्यावर आबा त्या गावच्या चावडीची वाट धरील... कुत्र्याचं धडपडणं जरी ऐकू आलं तरी आबा जागा होईल.'' पाठातील हा परिच्छेद पुन्हा वाचा. त्यात 'धरील', 'काढील', 'होईल' इत्यादींचा अर्थ 'धरतो', 'काढतो', 'होतो' असा लेखकाला अभिप्रेत आहे. आबा जे नेहमी करतो ते या पद्धतीने लेखकाने दाखवले आहे. हे या लेखनाचे एक वैशिष्ट्य आहे. अशी आणखी काही वाक्ये या पाठातून शोधा आणि त्यांचे अर्थ कायम ठेवून वरील पद्धतीने लिहा.

२. 'नाडी खालच्या चाकाला बांधली जाईल.' हे वाक्य 'तो नाडी खालच्या चाकाला बांधील' असेही लिहितात. पुढील वाक्ये या पद्धतीने लिहा.

   १. चादर गुंडाळली जाईल.
   २. गाठी मारल्या जातील.
   ३. दारात गठ्ठा सोडला जाईल.

३. कहाडतो (काढतो), कोनाले (कोणाला), डोये (डोळे), आये (आहे), असंन (असेल), काऊन (का म्हणून), मंजे (म्हणजे) असे वऱ्हाडी बोलीतील बरेच शब्द या पाठात आहेत. या पाठातून वऱ्हाडी बोलीतील आणखी काही शब्द शोधा आणि त्यांचा अर्थ समजून घ्या.

४. 'पायजे कोनाले चंच्या, पिवशा, झबले, कानटोपरे ऽऽऽ' ही आबाची साद आहे. ही साद तुम्ही मोठ्याने म्हणून दाखवा. पेपरवाला, भाजीवाला, बोहारीण, कल्हईवाला ही मंडळी कशी साद घालतात ते करून दाखवा.

* * *





# १८ अण्णा–एक दीपगृह

## शंकरराव खरात

शंकरराव रामजी खरात (जन्म : १९२१) कथालेखक, कादंबरीकार. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या चळवळीतील एक प्रमुख कार्यकर्ते. 'बारा बलुतेदार', 'दौंडी', 'सांगावा', 'तडीपार' इत्यादी कथासंग्रह. 'झोपडपट्टी', 'मी मुक्त! मी मुक्त' इत्यादी कादंबऱ्या. शिवाय 'अस्पृश्यांचा मुक्तिसंग्राम', 'डॉ. आंबेडकर यांचे धर्मांतर' इत्यादी सामाजिक विषयावरची पुस्तकेही त्यांनी लिहिली आहेत.

त्यांच्या 'तराळ-अंतराळ' या आत्मचरित्रातला हा उतारा. विद्यार्थिदशेत लेखक पुण्याला वसतिगृहात राहत असता कर्मवीर भाऊराव पाटील यांचा मोठा प्रभाव त्यांच्या मनावर पडला. कर्मवीरांपासून आपल्याला कोणती शिकवण मिळाली आणि तिचा आपल्याला सतत कसा उपयोग होत आहे, हे लेखकाने इथे सांगितले आहे.

मला अजूनही तो दिवस आठवतो. कडक ऊन पडलं होतं. त्यात फर्गसन कॉलेजची उघडीबोडकी टेकडी अधिकच भकास दिसत होती. टेकडीवरील गवत करपून ते पांढरट पडलं होतं. मधूनमधून काळ्या रंगाचे खडक उठून दिसत होते.

त्या घटकेला फर्गसन कॉलेजच्या क्रीडांगणाकडून पायवाटेनं कुणीएक व्यक्ती संथ पावलं टाकत येताना दिसली. टेकडीच्या पायथ्यानं तारेचं कुंपण ओलांडून ती पुढं आली. तिला पाहताच आमच्या बोर्डिंगमधलं कुणीतरी म्हणालं, 'अण्णा आले! अण्णा आले!' ते ऐकून प्रत्येकजण आपापल्या झोपडीच्या दारी लगबगीने आला.

मी तारेच्या कुंपणाकडं तटस्थ नजरेनं पाहू लागलो. अण्णा मंद मंद पावलं टाकत जवळ आले. त्यांना पाहून शेतकी कॉलेजचा नेटाक मदने पुढं धावला. फर्गसनचा अजिंक्य खेळाडू रामभाऊ कुंभार सामोरा आला. इंजिनियरिंग कॉलेजचा काळगेला वायदंडे बाहेर पडला. लॉ कॉलेजचा शिंदेही हात जोडून पुढं झाला. उंचेला जाधव हसऱ्या चेहऱ्यानं बाहेर आला. मीही त्या विद्यार्थ्यांच्या घोळक्यात मिसळलो.

आम्हांला पाहून ही जणू आपलीच मुलं या भावनेनं अण्णांचा चेहरा खुलला. अण्णा अंगापिंडानं तसे भरदार. आडवे-उभे भरलेले. मुळात भोगलेले कष्ट. त्यामुळं त्यांच्या थोराड देहाला काटकपणा, निबरपणा आलेला. पांढरीफेक लांब दाढी, माथ्यावरचे अर्धवट गळलेले केस, सावळा रंग, अंगात जाड खादीचा लांब नेहरू सदरा, खांद्यावर घोंगडी आणि अनवाणी अशी ती भव्य मूर्ती होती. त्यांना पाहताच कोणत्याही जाणत्या माणसाच्या अंतःकरणात आदराची भावना निर्माण होई.

सुटीचा दिवस. अण्णा दुपारीच आमच्या बोर्डिंगात आले. आम्ही विद्यार्थी त्यांच्याभोवती जमा झालो. सगळेच बहुजनसमाजातील आणि मागासलेल्या वर्गांतील विद्यार्थी. आम्ही सगळेच अठरापगड जातींचे. महार, मांग, वडार, रामोशी, कुंभार, कोष्टी, चांभार, धनगर, न्हावी, मराठा, मुसलमान, जैन अशा जातिधर्मांचे. पण वसतिगृहात एका आईच्या लेकरांगत आम्ही वागत होतो. इथं

आम्ही आमची जात, आमचं घरदार विसरलो होतो. विद्यार्थी ही फक्त एकच जात त्या वेळी माहीत होती. आमच्यावर विद्येचे संस्कार घडत होते. त्यातून आम्हांला 'मानवजात' दिसत होती. मानवजात ही जगात एकच जात आहे, अशी अण्णांची शिकवण होती.

दारिद्र्यानं गांजलेल्या गोरगरिबांच्या मुलांना कुठलं विश्वविद्यालयीन शिक्षण मिळणार! बिचाऱ्यांनी आपल्या गावची शाळा पुरी करावी. पुढं पाटीपुस्तकांना पैसे नाहीत म्हणून नाचार आईबापांच्या संसाराला आपले हात लावावे आणि दारातली शेरडंकरडं, गुरंढोरं रानामळ्यांत हिंडवायला न्यावीत. अशात मग त्यांची शिक्षणाची वाट सुटायची. विद्यार्थी कायमचा शिक्षणाला मुकायचा. त्यातही कुणी मॅट्रिक झालाच, तर भारी खर्चाचं कॉलेज-शिक्षण त्याला कोण देणार ? ते त्याला मिळणार तरी कसं, त्यातून मार्ग काय हाच एक विचार अण्णांच्या ध्यानीमनी होता. हीच त्यांच्या अंतरीची तळमळ होती. त्यातूनच पुण्याच्या या आमच्या बोर्डिंगचा जन्म झाला होता. गाडीवाट नसली तरी पाऊलवाट का असेना, अण्णांना ती दिसली आणि आम्हा विद्यार्थ्यांना त्यांनी त्या वाटेनं नेलं. ही पाऊलवाट खाचखळग्यांची होती. वाटेत दगडटोळे होते. काटेकुटेही होते. त्यातच आमच्या घरचं दारिद्र्य! आई-बापांचा नाचार, दुबळा संसार. ध्येयाची वाटचाल करत असताना पाऊलवाटेवर सगळ्या अडचणीच अडचणी आल्या; पण आण्णांनी दाखवलेलं ध्येयशिखर आम्हांला पुढं दिसत होतं. हृदयात आत्मविश्वास नि महत्त्वाकांक्षा उसळत होती. त्याच जोरावर आणि आशेवर आम्ही विद्यार्थी पुढं चाललो होतो.

आमच्या त्या झोपड्या म्हणजे आजूबाजूनं तट्ट्या आणि वर पत्रा. पुणे नगरपालिकेनं प्लेगाच्या साथीत त्या उभ्या केल्या होत्या. त्याच झोपड्या अण्णांनी मिळवल्या आणि 'युनियन बोर्डिंग' असा फलक त्यावर लावला. त्याच झोपड्यांत राहून आम्ही सुमारे तीस कॉलेज-विद्यार्थी पुढचं शिक्षण घेत होतो.

आमच्या वसतिगृहाजवळच्या टेकडीवर एक स्मारक होतं. देशाच्या सेवेसाठी आपलं उभं आयुष्य अर्पण करण्याची काही थोर पुरुषांनी इथं शपथ

घेतली. त्या प्रसंगाची आठवण म्हणून ते स्मारक तिथं आजही उभं आहे. झोपड्यांच्या तट्ट्यांतून येणाऱ्या थंडीवाऱ्यात, अंगावर घोंगडी लपेटून आम्ही अभ्यासाला बसत असू. कंदिलाच्या अंधुक उजेडात पुढं धरलेल्या पुस्तकात आमचे डोळे आणि मन मग्न होऊन जाई. आमच्या झोपड्या ऊन-पाऊस-वारा खात होत्या. त्यामुळं तट्ट्ये फाटत होते. त्यांना मोठमोठी भोकं पडत होती. अशा या झोपड्यांतून उच्च श्रेणीत उत्तीर्ण झालेले पदवीधर सालोसाल उजळ मुखानं बाहेर पडत होते. त्यांतले अनेकजण आज उच्च पदं विभूषित करत आहेत. तळागाळातून रत्नं बाहेर काढण्याचं अण्णांचं पवित्र व श्रेष्ठ कार्य अखंड चालू होतं.

आमच्या झोपड्यांच्या मावळतीला मातीवडार, गाडीवडार, दगडफोडे-वडार, अशा कष्टकरी लोकांच्या पत्र्यांच्या, तट्ट्याकाथ्यांच्या झोपड्याच झोपड्या होत्या. त्या कायमच्याच तिथं तळ देऊन होत्या. त्यांत पुन्हा सालोसाल भरच पडत होती. त्या झोपड्यांत दारिद्र्य कायम वस्तीला आलेलं होतं. अज्ञान, व्यसनं यांचीही सोबत त्या दारिद्र्याला होती. ते लोक रोज कष्ट करत होते, कसंतरी पोट भरत होते. जगत होते आणि आला दिवस घालवत होते. ते आमचे शेजारी आणि आम्ही त्यांचे शेजारी!

आमच्या उगवतीला फर्गसन कॉलेजच्या भव्य इमारती डोळ्यांत भरत होत्या. त्यांच्या आसपास धनिकांचे लहानमोठे टुमदार बंगले लक्ष वेधून घेत होते. एखादी मोटारगाडी झळाळत भर्रकन बंगल्यात येत होती, पुन्हा बाहेर जात होती. आत उंची कपडे घातलेले गोरेगोमटे चेहरे दिसत होते. त्यांच्या जगात सुख होतं. सौंदर्य होतं. संस्कृती होती. अशा परस्परविरोधी दोन जीवनांच्या मध्ये आमचं वसतिगृह होतं.

अण्णा बाहेर आरामखुर्चीवर बसले. आम्ही त्यांच्या भोवताली गोळा झालो. आमच्याकडं पाहून अण्णा म्हणाले, "हे बघा, इथून दिसणाऱ्या परस्परविरुद्ध अशा दोन संस्कृतींच्या मधला दुवा म्हणजे आपण आहोत. हे मधलं अंतर आपल्याला तोडायचंय..." अण्णांचं हे बोलणं आम्हांला खूपच काही शिकवून गेलं. आमच्या वसतिगृहातील प्रत्येक झोपडीत अण्णांच्या ध्येयवादाचं कोवळं

रोपटं वाढू लागलं. अण्णा उन्हातान्हात, अनवाणी, उघड्या डोक्यानं वणवण हिंडून त्याला खतपाणी घालत होते.

त्या वेळी, त्या वयातही मी विचार करत असे – ही विद्येची गंगा गोरगरिबांच्या झोपडीत कधी जाणार? अण्णांचं समाधान कधी होणार? आणि अण्णा अनवाणी पायांत पायताण कधी घालणार? मी मोठ्या आशेनं या गोष्टीची वाट पाहत असे. माझी अशी श्रद्धा होती आणि आत्मविश्वासही होता, की आज ना उद्या अण्णांचा 'पण' पुरा होईल. मग महाराष्ट्रातील दगडटोळक्यांतून, मातीच्या कणाकणांतून, झाडाझुडपांतून अण्णांच्या नावाचा – कर्मवीर भाऊराव पाटलांचा आणि त्यांच्या कार्याचा आवाज उठेल, घुमेल. त्याबरोबर गोरगरिबांचे, दुबळ्यांचे दुवा देणारे हात उंचावतील, मोडकळीस आलेले संसार उभे राहतील, विकासाच्या बंद झालेल्या वाटा मोकळ्या होतील आणि सुकलेले चेहरे टवटवीत होतील.

'माझा विद्यार्थी स्वावलंबी झाला पाहिजे. त्यानं कष्ट केले पाहिजेत. घाम गाळला पाहिजे. तो ध्येयवादी असला पाहिजे,' असं अण्णा नेहमीच म्हणत. तो त्यांचा गंभीर, जिद्दीचा आवाज माझ्या कानांत सतत घुमत असे.

त्या दिवशी वसतिगृहात स्वयंपाक करण्याची माझी पाळी होती. दोन-तीन तास चुलीपुढं बसून कंबर ताठली होती. मी भाकरी करण्यात गुंग होतो. भाकरी थापत होतो, तव्यातून भाकरी काढून चुलीतल्या लालभडक निखाऱ्यांवर भाजत होतो आणि भाकरीमागं भाकरी टोपल्यात फेकत होतो. धुरानं डोळ्याला सारखं पाणी येत होतं.

त्या वेळी मधेच अण्णा स्वयंपाकघरात आले. ते उभे राहून पाहत होते. डोळे भरून बघत होते. कौतुक करत होते. मला त्यांनी डोळे पुसताना पाहिलं आणि म्हणाले, "काय रे धूर झाला!"

त्यांना पाहताच बसल्या जागी मी उभा राहिलो आणि डोळे पुसत बोललो, "सरपण ओलं आहे, अण्णा."

"अरे, तू बैस, तुझं काम तू कर," असं बोलून तिथून जाता जाता अण्णा हलकेच पुढं म्हणाले, "अशी तपश्चर्या केल्याशिवाय प्रकाश दिसणार नाही!"

अण्णांचा हा संदेश आजही दीपगृहासारखा माझ्या जीवनात मला मार्गदर्शन करतो, प्रकाश दाखवतो!"



**शब्दार्थ व टिपा :**

**अठरापगड जाती**–अनेक जाती. **नाचार**–गरीब; गांजलेला. **मॅट्रिक**–पूर्वीची शालान्त परीक्षा. **प्लेग**–गाठीचा ताप; एक साथीचा रोग. **पण**–प्रतिज्ञा; शपथ.

**दुवा देणे**–एखादयाचे भले व्हावे असे मनापासून चिंतणे.

**दीपगृह**–धोक्याची सूचना देणारा आणि मार्गदर्शक दिवा असलेला समुद्रातील खडकावरचा उंच मनोरा.

**प्रश्न :**

१. बोर्डिंगमधील विद्यार्थ्यांचे अण्णांच्यावर विलक्षण प्रेम होते हे कोणत्या प्रसंगावरून दिसून येते?
२. मानवजात ही जगात एकच जात आहे, असे अण्णा का म्हणत असावे?
३. अण्णांच्या अंतरीची तळमळ कोणती होती? त्यासाठी त्यांनी काय केले?
४. परस्परविरोधी अशा कोणत्या दोन जीवनांमध्ये विद्यार्थ्यांचे वसतिगृह होते?
५. 'परस्परविरोधी दोन संस्कृतींमधील आपण दुवा आहोत,' या म्हणण्यातून अण्णांना काय सुचवायचे आहे?
६. अण्णांचा 'पण' कोणता होता? कोणत्या गोष्टी घडून तो पूर्ण व्हावा असे लेखकाला वाटत होते?
७. अण्णांना 'दीपगृह' असे लेखकाने का म्हटले आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. काटेकुटे, दगडधोंडे यांसारखे आणखी काही जोडशब्द सांगा.
२. स्वावलंबी व्हायचे ठरवा आणि त्यासाठी घरात तुम्ही कोणकोणती कामे कराल ते लिहा.
३. कर्मवीर भाऊराव पाटील यांचे चरित्र मिळवून वाचा.

***



# १७ मैफल

## विजय तेंडुलकर

**विजय धोंडोपंत तेंडुलकर** (जन्मः १९२८) कथाकार, नाटककार, पत्रकार व चित्रपटकथालेखक. 'श्रीमंत', 'शांतता कोर्ट चालू आहे', 'अशी पाखरे येती', 'घाशीराम कोतवाल' इत्यादी नाटके. 'काचपात्रे', 'द्वंद्व' इत्यादी लघुकथासंग्रह. याशिवाय त्यांचे काही ललितलेखसंग्रह आणि बालनाट्ये आहेत.

पुढील उतारा त्यांच्या 'कोवळी उन्हे' या ललितलेखसंग्रहातून घेतला आहे. मुंबईतले जीवन अतिशय घाईगर्दीचे असते. लोकांना ठराविक वेळीच ठराविक कामे करावी लागतात. वेळेच्या या बंधनामुळे संगीताच्या मैफलीसारख्या चांगल्या गोष्टींच्या आनंदालाही त्यांना कसे मुकावे लागते, ते या पाठात पाहा.

हवेत मस्त गारठा असावा. बाहेर पिठूर चांदणं. दुसऱ्या दिवशी सुटी आणि रात्र जागवायला समोर रसीली मैफल – आपल्या एखाद्या आवडत्या गायकाची.

परवा रात्री हे सुखस्वप्न अक्षरशः साकार झालं. जमलेल्या श्रोत्यांतलं कुणीतरी म्हणालं, 'आज अगदी मणिकांचनयोग आहे!' मला हे पुरेपूर पटलं. जमलेल्या श्रोत्यांचे चेहरे कसे निश्चिंत आणि प्रफुल्लित वाटत होते. मुंबईत दिवसाअखेरी माणसं अशी दिसणं एरवी अशक्य. नाट्यगृहात, गाण्याच्या मैफलीत, सभेत, उत्सवात सुंदर सुंदर कपड्यांतले देह बघावे तर मरगळलेले आणि चेहरे ओढलेले. त्या रात्री वाटलं, एक कॅमेरा असता तर भोवतालच्या त्या ओसंडत्या खुशीचे आणि प्रसन्नतेचे फोटो तरी काढून ते घरी लावले असते. ठेवणीतले गरम उबदार कपडे अंगाअंगांवर शोभत होते. उभ्या उभ्या गप्पा आणि हास्यविनोद रंगत होते. मनं अगदी हलकीफूल आणि टवटवीत वाटत होती.

ही खुशी आणखी थोडा वेळ अशीच व्यक्त होऊ द्यावी म्हणूनच की काय, हा कार्यक्रम तसा थोडासा उशिराच सुरू झाला आणि बघता बघता रंगला.



गाणारा हरहुन्नरी आणि तडफेनं गाणारा. ऐकणारे सुरावटीचा तो वर्षाव आसुसून झेलणारे. मग रंगतीला काय पार! प्रहररात्र कधी उलटली, बारा कधी वाजून गेले कुणाला कळलंच नाही! गवईबुवांनी 'कलावती'तली चीज संपवली तेव्हा साडेबारा वाजून गेले होते.

स्वरांची धुंदी चढलेला तो गायक आता पुरता खुलला होता. सारी रात्रदेखील तो आता चढत्या रंगतीनं गाऊ शकला असता. मैफलीचा पूर्वरंग आता कुठं संपत होता आणि काय झालं...श्रोत्यांत एकाएकी चुळबुळ सुरू झाली. मनगटी घड्याळं पाहिली जाऊ लागली. चोरट्या खाणाखुणा आणि कुजबुज होऊ लागली. एवढा वेळ संगीताच्या किमयेत विरघळून गेलेले बहुतेक चेहेरे आता व्यवहारी आणि कसल्यातरी चिंतेत असलेले दिसू लागले. अधलेमधले कुणी कुणी उठून बैठक सोडूनदेखील जाऊ लागले. कुणी अर्धवट उठून पुन्हा बसत होते. कुणी सरकत जाऊन नजीकच्या दाराजवळची जागा गाठली. गवईबुवांनी पुढची चीज सुरू केली; पण श्रोते काही आता पहिल्यासारखे त्या सुरांच्या वर्षावात स्वतःला हरवून घ्यायला तयार नव्हते. मैफल उघडउघड विस्कटलीच होती.

म्हणजे दुसरं तिसरं काही घडलं नव्हतं, तर शेवटच्या लोकलगाडीची वेळ होत आली होती. त्या बैठकीसाठी उपनगरांतून आलेल्या श्रोत्यांना याचं स्मरण झालं होतं आणि अनेकांचं चित्त लागलं होतं रेल्वेस्टेशनकडं. अनेकांचं मन गाणं आणि शेवटची लोकल यांत द्विधा झालं होतं. काहींना मात्र शेवटच्या लोकलनं जाण्याची घाई मुळीच नव्हती. पहाटेच्या पहिल्या लोकलनं जाण्याच्या तयारीनं ते आले होते, पण तरीदेखील शेवटची लोकल नेहमीच्या सवयीनं त्यांना अस्वस्थ करतच होती! या सगळ्याचा परिणाम म्हणजे उरलेल्या श्रोत्यांचा चांगलाच रसभंग झाला होता. काही वेळानंतर सभागृहाचा मागला भाग बराच रिकामा झाला. कुणी बाहेरच्या आवारातल्या चांदण्यात राजकारणाची कोरडी, गंभीर चर्चा करत होते; तर कुणी कँटीनपाशी कॉफी घेत व्यावसायिक, सांसारिक गप्पा करत जांभया देत होते. मघा मैफलीच्या आरंभी पाहिले ते प्रफुल्लित चेहरे ते हेच का, असा प्रश्न पडत होता! आणखी एका ठुमरीनंतर सभागृह चांगलं निम्मंअधिक मोकळं झालं.

मीही मग बाहेरच रेंगाळत राहिलो. सभोवती सुंदर चांदणं आणि मनात विस्कटल्या मैफलीचा विषाद. सुंदर जमलेल्या मैफली का बरं विस्कटाव्यात असा प्रश्न कुणीतरी माझ्या मनात एकसारखं विचारत होतं. कुणास ठाऊक, असा किती वेळ गेला. दोन अडीच वाजले असावेत. केव्हातरी सभागृहात चालू असलेलं एका जुन्या नाटकातलं प्रसिद्ध गीत मला बोलावू लागलं. ओढल्यासारखा मी आत गेलो आणि काय सांगू, आतलं दृश्य विलक्षण होतं!

गवई आणि त्याचे साथीदार यांच्यासमोर छोटंसं कडं करून जेमतेम पंधरावीसच श्रोते दाटीवाटीनं मांड्या ठोकून बसले होते. मांडीवर, पुढ्यात, बाजूला पानाच्या चंच्या, टोप्या, हातात धरायच्या आडव्या ठेवलेल्या काठ्या होत्या आणि श्रोत्यांच्या मुद्रांवर उतू जाणारी बेहोषी होती. समोर उमटणाऱ्या एकेका सुरावटीसरशी, ते मूठभरच धुंद जीव अंगावरून गंगेचा ओघ जावा, तसे रोमांचित होत होते. डोलत होते. डोळे कधी तृप्तीनं मिटत होते, तर कधी आनंदानं धुंद होत होते. ते सारे रसिकजन मुक्तपणं दाद देत होते. त्या मूठभरच संगीतवेड्यांपुढं तो गवईदेखील तितकाच देहभान विसरून गात होता. असं



वाटलं, या एवढ्या मोठ्या सभागृहाच्या एका कोपऱ्यात बसलेली ही मंडळी सुरांच्या एका अफाट, अद्‌भुत, दुनियेत कुठल्याकुठं हरवली आहेत. त्यांच्या लेखी या वेळी दुसरं तिसरं काही शिल्लकच नाही, आहे ते फक्त सुरांचं मंतरलेलं जग!

असं थरारून टाकणारं दृश्य मी क्वचितच पाहिलं असेल. वाटलं, की आम्ही किती झालो तरी शेवटी लहानच माणसं. सांसारिक चिंता, देशातली आणि कचेरीतली राजकारणं आणि दैनंदिन व्यवहार आम्ही कसल्याही उच्च आनंदासाठी विसरूच शकत नाही. त्याचं भान कुठंतरी सतत राहतं आणि त्यामुळं सगळा विरस होतो. स्वतःला कलेच्या असीम आनंदात भिरकावून देणारे, देहभान आणि दिवसरात्र विसरून केवळ कलानंद जगणारे हे खरे रसिक!

त्या रसिकांपुढं मी नम्र झालो, आणि घरची वाट धरली.

**शब्दार्थ व टिपा :**

**रसीली**–रंगतदार. **मैफल**–संगीताचा कार्यक्रम. **हरहुन्नरी**–विविध प्रकारची कौशल्ये असलेला. **प्रहररात्र**–रात्रीचा एकअष्टमांश भाग. **चीज**–विशिष्ट सुरावटीतले गीत.

**पूर्वरंग**–पूर्वार्ध. **किमया**–जादू; अद्‌भुत गोष्ट. **विषाद**–दु:ख; खेद. **मंतरलेले**–भारलेले.

**स्वप्न साकार होणे**–मनोरथ पूर्ण होणे. **मन द्‌विधा होणे**–दोन गोष्टींपैकी कोणती करावी याबद्दल मनाचा निश्चय न होणे. **रसभंग होणे**–मधेच अडथळा आल्यामुळे एखाद्या गोष्टीचा आनंद कमी होणे. **उतू जाणे**–ओसंडून वाहणे. **दाद देणे**–प्रतिसाद देणे; पसंती दाखवणे.

**मणिकांचनयोग**–रत्नाला सोन्याच्या कोंदणाने अधिक शोभा येते, त्याप्रमाणे एक-मेकांना अनुरूप अशा दोन चांगल्या गोष्टी एकत्र येणे. **कलावती**–संगीतातील एका रागाचे नाव. (विशिष्ट सुरावटीला 'राग' असे म्हणतात.) **ठुमरी**–एक गायन प्रकार. **लोकलगाडी**–मुंबईसारख्या मोठ्या शहरात जा-ये करणारी स्थानिक आगगाडी.

**प्रश्न :**

१. जमलेल्या श्रोत्यांकडे पाहिल्यावर लेखकाच्या मनात कोणते विचार आले?

२. श्रोत्यांमध्ये एकाएकी चुळबुळ का सुरू झाली?

३. मैफलीच्या आरंभी पाहिलेले श्रोत्यांचे चेहरे ते हेच का, असा प्रश्न लेखकाला का पडला?

४. उरलेल्या मूठभर श्रोत्यांची हालचाल लेखकाने कोणत्या शब्दांत वर्णन केली आहे?

५. खरे रसिक कोणाला म्हणावे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. आसुसणे, हरहुन्नरी, मरगळणे, किमया, व्यावसायिक या शब्दांचा अर्थ लक्षात घेऊन त्यांचा वाक्यांत उपयोग करा.

२. या पाठात 'कुजबुज' हा ध्वनी दर्शवणारा शब्द आला आहे. त्या विशिष्ट ध्वनीनुसार या शब्दातले पहिले व तिसरे अक्षर ऱ्हस्व उच्चारले आणि लिहिले जाते. 'झुळझुळ', 'टिकटिक' हे याच प्रकारचे शब्द आहेत. असे आणखी काही शब्द मिळवा आणि त्यांचा उपयोग करून वाक्ये लिहा.

३. 'सुरावट', 'ठुमरी' असे संगीतातील काही शब्द या पाठात आले आहेत. असे आणखी काही शब्द मिळवा आणि ते वहीत लिहून ठेवा.

४. या पाठात गाण्याच्या मैफलीचे वर्णन आले आहे. तुमच्या शाळेत झालेल्या एखाद्या सांस्कृतिक कार्यक्रमाचे वर्णन लिहा.

* * *



## १८ मोटार पाहावी घेऊन!

### चिं. वि. जोशी

**चिंतामण विनायक जोशी** (जन्म : १८९२; मृत्यू: १९६६) विनोदी कथालेखक. 'एरंडाचे गुऱ्हाळ', 'चिमणरावाचे चऱ्हाट', 'वायफळाचा मळा', 'चौथे चिमणराव' इत्यादी त्यांची पुस्तके. चिमणराव आणि गुंड्याभाऊ या दोन विनोदी व्यक्ती त्यांनी वाङ्मयात लोकप्रिय केल्या. सर्वसामान्य माणसाच्या दैनंदिन जीवनातल्या लहानलहान प्रसंगांतून आणि मनुष्यस्वभावातल्या विसंगतींतून विनोद निर्माण करणे हे त्यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य.

चिमणराव एक मध्यमवर्गीय संसारी माणूस. आपल्या घरी मोटार असावी असे त्यांना वाटते आणि एक जुनी मोटार ते मोठ्या हौसेने खरेदी करतात. ही मोटार चिमणरावांच्या जीवनात काय काय गमती निर्माण करते याचे वर्णन येथे केले आहे.

**मोटार घेणारांना उत्तम संधी**
आमच्याकडे सर्वांना परवडतील अशा स्वस्त किमतीच्या मोटारी विकायच्या आहेत. प्रत्यक्ष पाहून खात्री करा.
**–जाफर जावजी लिलाववाले, पुणे लष्कर.**

**वर्तमानपत्रात** आलेली ही जाहिरात पाहिल्यावर मोटार घेण्याच्या माझ्या इच्छेनं उचल खाल्ली.

खिशात पाचशे रुपयांच्या नोटा ठेवून मी गुंड्याभाऊकडं गेलो. त्याला ती जाहिरात दाखवली. "किती पैसे खर्चायला तू तयार आहेस?" त्यानं मला विचारलं.

"हे बघ," पाचशे रुपयांच्या नोटांचं पुडकं त्याच्यापुढं टाकून मी म्हटलं, "पाचशे रुपये!"

नोटा मोजून तो हसत म्हणाला, "अरे, हल्लीच्या चढत्या बाजारात पाचशे रुपयांत सेकंडहँड मोटार-सायकलदेखील मिळायची नाही. मग गाडी कशी मिळेल?"



"भाऊ, जाहिरातीत स्पष्ट दिलं आहे ना, की सर्वांना परवडतील अशा गाड्या आमच्याकडं आहेत म्हणून? पाचशेची गाडी नसली तर जाहिरात देणाऱ्याचा कान पकडून विचारीन, की तू अशी खोटी जाहिरात का दिलीस म्हणून."

गुंड्याभाऊच्या मोटारीतून आम्ही दोघे जाफर जावजीकडं गेलो. नाना प्रकारचं सामान पटांगणभर पसरलं होतं. वीस-पंचवीस मोटारी तिथं उभ्या होत्या.

आम्हा दोघांना पाहून एक मनुष्य तिथं आला आणि सलाम करून म्हणाला, "आपल्याला काय पाहिजे, साहेब?"

"आम्हांला मोटार घ्यायची आहे," असं मी ऐटीत म्हटलं.

"असं. असं!" तो बोलला, "आमच्याजवळ अगदी थोड्या वापरलेल्या गाड्या आहेत. एक गाडी तर अशी आहे, की मूळ मालकानं ती नऊ हजारांना

कोरी घेतली. पाच दिवस वापरल्यावर त्याला अमेरिकेला जावं लागलं. ती गाडी सहा हजारांना विकून टाकायची आहे.''

''हे पाहा जाफरसाहेब, इतक्या किमतीची गाडी आम्हांला नको. यापेक्षा स्वस्त किमतीची दाखवा.'' – गुंड्याभाऊ.

जाफरशेटनी दोन हजारांपर्यंत किमतीच्या गाड्या दाखवल्या. माझी मागणी त्यांहून कमी किमतीच्या वाहनाची आहे, असं ऐकल्यावर तो म्हणाला, ''तर मग साहेब, खेळण्याच्या दुकानात जाऊन एखादी किल्लीची मोटारच घ्या. दोनअडीच रुपयांना मिळेल!''

मी म्हणालो, ''शेट, अशी मस्करी करू नका. माझ्याजवळ रोख पाचशे रुपये आहेत. तेवढ्यात मिळण्यासारखी गाडी तुमच्याजवळ असली तर सांगा.''

''आता ठीक बोललात, साहेब. पहिल्यांदाच असं सांगितलं असतंत, तर दोन हजारांच्यावर किंमत असलेल्या गाड्या तुम्हांला दाखवल्याच नसत्या.''

ते नोकराला म्हणाले, ''दाऊद, मोडतोड विभागात ते जुनं मॉडेल ठेवलं आहे, ते साहेबांना दाखव. पाचशेला देऊन टाकू.''

दाऊदच्यामागून आम्ही लोखंडाच्या मोडतोड विभागात गेलो. त्यात मोटारीचा एक सांगाडा ठेवला होता. गुंड्याभाऊनं मोटार तपासली. ती बऱ्या स्थितीत होती. परंतु तिच्यात 'पेटतेल' टाकून चालवून पाहिल्याशिवाय ती घेणं वेडेपणाचं झालं असतं.

दाऊद म्हणाला, ''तुम्ही अडीचशे रुपये डिपॉझिट ठेवत असाल तर गाडी चालती करून देऊ. बाकीचे अडीचशे रुपये चार दिवसांनी द्या अन् मोटारीत बसून घरी जा.''

आम्हांला सौदा पटला. जाफरशेटच्या मॅनेजरजवळ अडीचशे रुपये भरून आणि चार दिवसांनी परत येण्याचं कबूल करून आम्ही घरी परतलो.

जेवणाच्या वेळी मोटारीची वाच्यता केल्याशिवाय माझ्याच्यानं राहवेना. एकदम मोटारच आणून दाराशी उभी करायची आणि सगळ्यांना चकित करून सोडायचं, असा माझा विचार होता; परंतु एखादं रहस्य फार वेळ पोटात ठेवायचं

कसब माझ्या अंगी नव्हतं. मी एकदम बोलून गेलो, ''उद्या काय जंमत येणार आहे आपल्याकडं, ओळखा!''

मोरूला वाटलं रेडिओ, राघूला वाटलं टाइपरायटर, तर मैनाला वाटलं विजेचा पंखा. मोटारीपर्यंत कुणाचीच उडी जाईना. शेवटी मी म्हणालो, ''उद्या आपली मोटार येणार आहे!''

सौ. म्हणाली, ''लॉटरीत बक्षीस मिळालं की काय?''

''बक्षीस नाही मिळालं. चांगली विकत घेतली आहे मोटार, पाचशे रुपयांना.''

''कोणत्या रंगाची आहे?'' साळूनं विचारलं

''किती माणसं आत बसू शकतील?'' – सौ.

''मला चालवता येईल की नाही?'' – राघू

''अरे, पण ती ठेवायची कुठं? हल्लीच्या दिवसांत मोटार ठेवायला जागातरी कुठं मिळणार आहे?'' – आई.

या सगळ्या प्रश्नांच्या सरबत्तीला मी यथाशक्ती उत्तरं देत होतो; पण 'ती ठेवायची कुठं?' हा आईचा प्रश्न विशेष अडचणीचा वाटला. सध्या रस्त्याच्या कडेला ठेवून द्यावी, असं मी सुचवलं. मोटारचालक ठेवणं माझ्या आटोक्याबाहेरचं असल्यामुळं स्वतःच चालक बनणं मला भाग होतं.

गुंड्याभाऊकडं जाऊन मोटार चालवण्याचे धडे घ्यायचं मी ठरवलं आणि त्याप्रमाणं त्याच्याकडं जाऊ लागलो. त्यानं दिलेला पाठ रात्रीच्या वेळी जागरण करून मी गिरवत होतो. खुर्चीवर बसून आणि हातांत काठी धरून मोटारीतलं सुकाणू चाक कसं फिरवायचं याची सवय करत मी रात्रभर बसलो होतो. रात्री दोन वाजता आई जागी झाली. माझ्या माडीचं दार उघडं राहिलं असल्यानं रस्त्यातल्या दिव्याचा अंधुक उजेड आत पसरलेला होता. खुर्चीवर बसून मी हवेत नाना प्रकारचे हातवारे करत आहे, असं पाहून ती घाबरली. मागून येऊन माझ्या खांद्यावर हात ठेवून ती म्हणाली, ''अप्पा अप्पा, जागा हो!''

मी मोटार चालवण्याच्या सुखस्वप्नात इतका गर्क झालो होतो, की आपण आपल्या माडीत मोटार चालवण्याची केवळ कवाईत करत आहो याचं भान



आपल्याच तंद्रीत : महाराष्ट्रीय स्त्री (एक व्यक्तिचित्र) चित्रकार : ए. एक्स. त्रिंदाद

**आपल्याच तंद्रीत : महाराष्ट्रीय स्त्री** (एक व्यक्तिचित्र) चित्रकार : ए. एक्स. त्रिंदाद

एखाद्या व्यक्तीस समोर बसवून काढलेल्या चित्रास व्यक्तिचित्र असे म्हणतात. तुम्ही पाहत आहात हेही एक व्यक्तिचित्र आहे. या चित्रात एक महाराष्ट्रीय स्त्री आपल्याच तंद्रीत बसलेली दिसते. तंद्री इतकी लागलेली आहे, की तिला आपल्या डोक्यावरच्या ढळलेल्या पदराचेही भान नाही. कसल्यातरी विचारात ती गढून गेलेली असावी असा भाव तिच्या चेह-यावर दिसतो. अशी नेमकी भावस्थिती चित्रित करणे मोठे कौशल्याचे असते. हे चित्र एका थोर चित्रकाराने काढलेले आहे. त्यांचे नाव आहे ए. एक्स. त्रिंदाद.

त्रिंदाद यांची व्यक्तिचित्रे अजोड अशी आहेत. त्यांच्या कुंचल्याचे कौशल्य या चित्रात जाणवते. चित्रातील स्त्रीच्या चेहऱ्यावरील बारीकसारीक भाव हळुवारपणे टिपलेले दिसतात. याशिवाय रंगांचा तजेलदारपणा आणि विविध नाजूक छटाही त्यांच्या या चित्राची शोभा वाढवतात. अखंड तपश्चर्येशिवाय अशी कला साध्य होत नाही. त्रिंदाद यांचे हे चित्र तैलरंगातले आहे. या चित्राला पन्नासहून अधिक वर्षे लोटली, तरी आजही ते चित्र ताजे टवटवीत वाटते. श्रेष्ठ कलागुण असलेल्या चित्रकारासच ही किमया साधते.

हे चित्र पुन्हा पुन्हा पाहावेसे वाटते. चित्रातील स्त्रीची बसण्याची पद्धत, चेहे-यावरील भाव, अंगातील खणाची चोळी, गळ्यातील कंठा, दंडातील वाकी, कपाळावरील गोंदण व त्यावर कुंकवाचा मोठा टिळा हे सर्व बारकावे चित्रकाराने अशा कौशल्याने रंगवले आहेत, की त्यामुळे या स्त्रीचे शालीन व्यक्तिमत्त्व उठून दिसते. हातांत धरलेल्या पारदर्शक बरणीने चित्राची शोभा आणखी वाढते. निमगोरी अंगकांती व साधीसुधी केसांची ठेवण या गोष्टी चित्रकाराच्या कुंचल्यातून हुबेहूब उतरल्या आहेत. हे चित्र पाहताना असे वाटते, की जणू एखादी स्त्रीच आपल्यासमोर बसलेली आहे! इतके हे चित्र जिवंत वाटते.

व्यक्तिचित्र ही कला खडतर साधना केल्याशिवाय साध्य होत नाही. त्याशिवाय सूक्ष्म निरीक्षण, चांगले तंत्र-कौशल्य आणि आपल्या कलेत अहोरात्र रममाण होण्याची प्रवृत्ती असल्याशिवाय असे श्रेष्ठ दर्जाचे चित्र काढता येत नाही. व्यक्तिचित्र ही कला आपण इंग्रज चित्रकारांकडून शिकलो. आपल्या देशातील अनेक चित्रकारांनी ही कला आत्मसात केली आहे; परंतु त्रिंदाद यांच्या चित्रातील गोडवा अन्य चित्रकारांच्या चित्रांत क्वचितच आढळतो.

त्रिंदाद हे मुंबईच्या जमशेटजी जीजीभॉय कला- विद्यालयात शिकले व नंतर तेथेच शिक्षकही होते. या विद्यालयातून ते सेवानिवृत्त झाले; परंतु सेवानिवृत्तीनंतरही आयुष्याच्या अखेरपर्यंत ते आपली कलासाधना करीत राहिले.

मुंबईत माहीम येथे 'कॅसाबियांका' नावाचा त्यांचा बंगला आहे. या बंगल्यात आजही कलारसिकांची मती गुंग करून टाकणाऱ्या त्यांच्या चित्रांचा संग्रह पहावयास मिळतो.

(मूळचित्र : कला संचालनालय, मुंबई, यांच्या सौजन्याने.)

नाहीसं झालं होतं. रहदारीचा नियम मोडल्याबद्दल पोलीस शिपायानं येऊन आपली मानगुटी पकडली आहे, असं मला वाटलं आणि म्हणालो, ''माफ करा फौजदारसाहेब, मी अजून शिकतो आहे.''

''अरे देवा, याला वायू झाला की काय! सूनबाई, ऊठ लवकर,'' घाबऱ्या घाबऱ्या आई म्हणाली. तिची सूनबाई जागी झाली. तिनं मोरूला हाक मारली तेवढ्यात मी नीट शुद्धीवर आलो. मोटार चालवण्याची कवाईत करत होतो, असं मी सांगितल्यावर सगळेजण एक होऊन मला हसले.

चारपाच दिवसांत आमची मोटार दुरुस्त झाली. राहिलेले अडीचशे रुपये देऊन टाकले आणि मोटार घरी पोचवण्यासाठी दाऊदला बरोबर घेतलं. घरापाशी आमच्या कुटुंबातली सर्व माणसं, आमचे शेजारी आणि घरमालक असे सर्वजण मोटारीचं स्वागत करायला उभे राहिले होते. सगळ्यांना मोटार बघून आनंद होईल अशा कल्पनेनं मी त्यांच्याकडं हसतमुखानं पाहिलं; पण माझ्या कुटुंबातल्या माणसांच्या तोंडांवर निराशेचं आणि इतरांच्या तोंडांवर उपहासाचं प्रतिबिंब दिसत होतं.

''आता उगीच नावं ठेवत बसू नका मोटारीला. कुठूनतरी गावात एका ठिकाणाहून दुसरीकडं पोचलं म्हणजे झालं. चला, आता कुणीतरी तिघं बसा मोटारीत. मंडईभोवती एक चक्कर मारून परत येऊ, मग दुसऱ्या तिघांना घेऊन जाईन,'' मी ऐटीनं म्हणालो.

साळू आणि सौ. मागल्या बैठकीवर जाऊन बसल्या आणि मोरू पुढं बसला. चालकस्थानी अर्थात मी होतो!

''तुळशीबागेशी थांबवा बरं का गाडी! आपण दर्शन घेऊन येऊ,'' सौ. म्हणाली.

गाडी चालू करण्याकरिता अवश्य असणारं सर्व तंत्र मी काळजीपूर्वक पाळलं; पण गाडी काही सुरू होईना. म्हणून मोरूला हँडल मारायला सांगितलं. कितीतरी वेळ तो हँडल गरगर फिरवत होता; पण इंजिन चालू होईना. हँडल मारून मारून घामाघूम झालेल्या मोरूला आई म्हणाली, ''मोरू, किल्ली फार फिरवू नकोस. साळूला किल्लीची मोटार आणली होती. तिनं जास्त किल्ली

दिल्यामुळं तिची स्प्रिंग तुटून गेली. तशी याही मोटारीची स्प्रिंग तुटेल फार किल्ली दिलीस तर!''

मी बटण फिरवलं आणि इंजिन चालू होऊन हीव भरल्यासारखी गाडी थडथडू लागली. मोरू आत येऊन बसला. तेवढ्यात मोटारीचं हीव बरं झालं आणि ती मख्खपणं उभी राहिली. पुन्हा एकदा सर्व तंत्र पार पाडलं आणि मोरू हँडल फिरवत असताच गाडी चालू झाली. तो हँडल सोडून तसाच बाजूला झाला म्हणून बरं झालं, नाहीतर अपघातच व्हायचा! आमच्या मोटारीतून 'चिरचिर', 'खुळखुळ' आणि 'फाट्फुट्' असे तीन प्रकारचे आवाज निघत असल्यानं पादचारी लोक घाबरून आम्हांला वाट देत होते.

ऑफिसात यापुढं मोटारनं जाण्याचा उपक्रम मी सुरू केला. गाडी चालू करताना मुलांपैकी दोघे मागून ढकलत असत आणि ऑफिसातून परत येताना तिथला शिपाई ढकलत असे. त्याचं घर वाटेत असल्यानं गाडी ढकलून इंजिन 'फुरफुर' करू लागताच तो उडी मारून आत बसे. त्याच्या घराजवळ मी वेग कमी करत असे.

जोगसाहेबांनी मोटार ठेवली आहे हे कळल्यापासून ऑफिसात माझी प्रतिष्ठा वाढली. बरोबरीचे अधिकारीही माझ्याविषयी आदर दाखवू लागले. 'परत जाताना मला न्याल काय?' अशी विनंती वारंवार होऊ लागली. पण एकदा आमच्या मोटारीत बसलेल्या मनुष्यानं पुन्हा बसण्यासाठी चुकूनही कधी विनंती केली नाही! एके दिवशी आमचे अधिकारी सदाशिव अय्यर माझ्या मोटरीतून ऑफिसात जाण्यासाठी माझ्याकडं आले. त्या दिवशी दिल्लीहून एक बडे अधिकारी तपासणीसाठी यायचे असल्यानं आम्हांला जरा लवकरच ऑफिसात पोचणं आवश्यक होतं. दोन कारकूनही 'आम्हांला घेऊन जाता का?' अशी विनंती करू लागले, तेव्हा त्यांनाही बरोबर घेतलं. मोठ्या अभिमानानं तीन सहकाऱ्यांना घेऊन ऑफिसकडं निघालो. कंपाऊंडात शिरलो, परंतु गाडी थांबेना. आतापर्यंत निघताना ती हटवादीपणा करत होती, पण आज थांबण्याचंसुद्धा ती मनावर घेईना. काही केल्या इंजिन बंद होईना. बेफाम घोड्यासारखी ती अगदी स्वैर बनली होती. ऑफिसमधून 'बाहेर'च्या फाटकाने




बाहेर निघाल्यावर पुन्हा 'आत' मधून आत शिरलो. एका फाटकातून बाहेर निघाल्यावर दुसऱ्यातून आत शिरायचं आणि परत तसेच गाडी थांबवण्याचे प्रयत्न करत गरगर फिरायचं. याशिवाय मीतरी काय करणार? अय्यर आणि दोन कारकून संतापले.

"अहो, गाडी थांबवा की. आमची हौस पूर्ण झाली." ते ओरडून म्हणाले.

"बाबांनो, गाडी थांबवायचा मी आटोकाट प्रयत्न करत आहे; पण ती थांबतच नाही!" मी ओरडून उत्तर दिलं.

अर्धा-पाऊण तास झाला. जोग अशा प्रदक्षिणा का घालत आहेत, याचा उलगडा न झाल्यामुळं ऑफिसच्या नोकरांची आणि इतर बघ्या लोकांची ही गर्दी पोर्चमध्ये जमली! गाडी चालवून तिच्यातलं पेट्रोल संपलं, की ती आपोआप बंद पडेल असा मला विश्वास होता. दिल्लीच्या त्या लष्करी अधिकाऱ्यांची



भव्य गाडी आमच्या ऑफिसच्या फाटकात शिरत असताना माझी मोटार प्रदक्षिण घालत तिच्या मागोमाग आली आणि तिच्या पृष्ठभागावर तिनं एडक्यासारखी धडक दिली. ती गाडी भक्कम आणि लष्करी उपयोगाच्या बांधणीची असल्यानं तिचा मागचा भाग थोडा मोडण्यापेक्षा तिची अधिक नुकसानी झाली नाही. माझ्या मोटारीचं मात्र नाक चांगलंच सडकलं; पण किंचित कमी वेगात असलेल्या वाहनावर ती आदळल्यानं तिला मोठा धक्का बसला नाही. फक्त माझं कपाळ सुकाणूचक्रावर आपटून टेंगूळ आलं. अय्यरसाहेबांचा चष्मा फुटला आणि मागच्या बैठकीवर बसलेल्या दोघा कारकुनांच्या हिरड्या सुजल्या.

आता मोटारीवर माझ्याशिवाय कुणाचंच प्रेम उरलं नव्हतं. आईला देवदर्शनाकरिता तुळशीबागेकडं घेऊन गेलो. मोटार काही केल्या थांबेना, म्हणून देवळाभोवती प्रदक्षिणा घालत राहिलो. आई म्हणाली, "अरे बाबा, देवाच्या गाभाऱ्याला पायांनी प्रदक्षिणा घालायच्या असतात; मोटारीत बसून संबंध देवळाला नसतात घालायच्या!" वीस प्रदक्षिणा झाल्यावर तिला भोवळ आली. असल्या खट्याळ वाहनातून पुन्हा न जाण्याचा तिनं निश्चय केला. शेजारणी-पाजारणी आमच्या मोटारीकडं पाहून हसतात,म्हणून सौ. आणि मुलं यांनाही ती नकोशी वाटत होती. गुंड्याभाऊची तर स्वतःची गाडी होती. तात्पर्य, माझ्याशिवाय तिला कुणी वाली उरला नव्हता!

**शब्दार्थ व टिपा :**

**सेकंडहँड**–वापरलेली जुनी वस्तू. **मॉडेल**–नमुना. **पेटतेल**–'पेट्रोल' यासाठी लेखकाने योजलेला शब्द. **डिपॉझिट**–हमी म्हणून आगाऊ दिलेली रक्कम. **सौदा**–खरेदीचा व्यवहार. **कसब**–कौशल्य. **सरबत्ती**–भडिमार. **यथाशक्ती**–कुवतीप्रमाणे. **स्वैर**–कसलेही नियंत्रण नसलेली. **वाली**–कैवारी; रक्षण करणारा.

**उचल खाणे**–मागे पडलेला एखादा विचार किंवा इच्छा मनात पुन्हा जोराने उत्पन्न होणे. **वाच्यता करणे**–मनातले गुपित अनेकांसमोर बोलून उघड करणे. **वायू होणे**–वात झाल्यामुळे बरळणे.

**सुकाणू**–नौकेला दिशा दाखवणारे विशिष्ट यंत्र. या पाठात हा शब्द मोटारीत बसवलेल्या, मोटार हवी त्या दिशेला वळवणाऱ्या चाकाबद्दल वापरला आहे.

**प्रश्न :**

१. नोटा मोजल्यावर गुंड्याभाऊंना हसू का आले?
२. 'खेळण्याच्या दुकानात जाऊन एखादी किल्लीची मोटारच घ्या!' असे चिमणरावांना कोण म्हणाले? का?
३. 'आपली मोटार उद्या येणार आहे,' असे चिमणरावांनी सांगताच कोण कोण, काय काय म्हणाले?
४. चिमणरावांना वायू झाला आहे, असे त्यांच्या आईला कशामुळे वाटले?
५. चिमणरावांच्या मोटारीत एकदा बसल्यावर तीत पुन्हा बसण्याची कोणाचीही तयारी का नसे?
६. मोटारीतून देवळाकडे गेल्यावर चिमणरावांच्या आईला भोवळ का आली?
७. चिमणरावांची मोटार बाळगण्याची हौस अखेर पूर्ण झाली नाही, याचे कारण काय असावे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. पाठातील कोणती वाक्ये वाचताना तुम्हांला हसू येते, ते सांगा.
२. 'पेट्रोल' या इंग्रजी शब्दासाठी 'पेटतेल' हा मराठी शब्द लेखकाने योजला आहे. 'सुकाणू-चक्र' हा मराठी शब्द कोणत्या इंग्रजी शब्दासाठी वापरला आहे, हे समजून खालील इंग्रजी शब्दांबद्दल कोणते मराठी शब्द वापरले जातात, ते लिहा:
   कंपाउंड, इंजिन, फोटो, लायब्ररी, ऑफिस.
३. तुमच्या आसपास असे काही विनोदी प्रसंग घडले असल्यास ते वर्गसभेत सांगा.

* * *



# ११ गांधीजींच्या शब्दांत गोखले

## वसंत आगाशे

**वसंत बळवंत आगाशे** (जन्मः १९२६) सामाजिक कार्यकर्ते व वक्ते. 'नवयुग वाचनमाला' संपादित करण्यात सहभाग. अन्य काही पुस्तकांचे संकलन व संपादन. नियतकालिकांतून प्रासंगिक लेखन.

गोपाळ कृष्ण गोखले यांना महात्मा गांधी आपले गुरु मानत. आपल्या गुरूंविषयीचे गांधीजींचे विचार व भावना या पाठात गांधीजींच्याच शब्दांत संकलित केल्या आहेत.

दक्षिण आफ्रिकेतील आम्ही हिंदी लोकांनी तिथल्या गोऱ्या सत्तेच्या अन्यायविरोधी लढा चालवला होता. भारतीय जनतेला त्याची माहिती दयावी म्हणून १८९६ साली काही दिवसांसाठी मी स्वदेशात परत आलो. त्या वेळी भारताच्या बहुतेक सर्व थोर नेत्यांना मी भेटलो.

गोखल्यांशी माझी भेट फर्गुसन कॉलेजच्या आवारातील त्यांच्या निवासस्थानी झाली. एखादया जुन्या मित्राला भेटावं तशी माझी ती भेट होती. त्यांची शांत, कनवाळू मुद्रा पाहून क्षणभरातच मला अगदी मोकळेपणा वाटू लागला. माझ्यासंबंधी आणि दक्षिण आफ्रिकेतील माझ्या कार्यासंबंधी त्यांनी बारीकसारीक माहिती विचारली. पहिल्या भेटीतच मी त्यांच्याकडं आकर्षित झालो. मी जेव्हा त्यांचा निरोप घेतला तेव्हा मनात म्हणालो, ''मी ज्या व्यक्तीच्या शोधात होतो ती व्यक्ती हीच!''

१९०१ साली दक्षिण आफ्रिकेतून मी भारतात पुन्हा परत आलो, तेव्हा तर गोखले व मी अधिकच जवळ आलो. त्यांनी मला हाताशी धरलं. मी बोलतो कसा, वागतो कसा, कोणता पोशाख करतो, काय खातो याची ते काळजी करू लागले. यापेक्षा माझी अधिक काळजी माझ्या आईनंही घेतली नसती. त्यांच्या प्रेमळ वागणुकीमुळं व मार्गदर्शनामुळं माझ्या जीवनाला चांगलं वळण लागलं.

गोखले त्या वेळी कलकत्त्यात होते. मलाही कलकत्त्याला जायचं होतं. गोखल्यांना जेव्हा हे समजलं तेव्हा त्यांनी मला आपल्या निवासस्थानी राहायला बोलावलं. मी होकारही दिला. पण का कुणास ठाऊक, आपण होऊन त्यांच्याकडं जायला माझं मन घेईना. मला संकोच वाटत होता. मग ते स्वतःच येऊन मला आपल्या घरी घेऊन गेले.

अगदी पहिल्या दिवसापासून मी त्यांच्या घरातलाच कुणी आहे, असं त्यांच्या सहवासात मला वाटायला लागलं. मी जणू काही त्यांचा धाकटा भाऊ आहे अशा रीतीनं ते मला वागवू लागले. माझ्या सर्व गरजा त्यांनी स्वतः जाणून घेतल्या आणि त्या पूर्ण होतील अशी व्यवस्था केली. तशा माझ्या गरजा फार थोड्या होत्या. मी स्वावलंबनाची सवय लावून घेतलेली असल्यामुळं माझी कुणी देखभाल करावी अशी जरुरी जवळजवळ नव्हतीच. स्वतःची काळजी स्वतःच घेण्याची माझी सवय, माझी वैयक्तिक स्वच्छता, चिकाटी आणि माझा नियमितपणा याचं गोखल्यांना खूप कौतुक वाटे.

माझ्यापासून ते कधी काही दडवून ठेवत नसत. त्यांना भेटायला येणाऱ्या सर्व महत्त्वाच्या लोकांशी ते माझा परिचय करून देत. त्यांपैकी मला विशेष आठवतात ते म्हणजे डॉ. प्रफुल्लचंद्र राय. ते अगदी शेजारच्याच घरात राहत आणि गोखल्यांकडं वारंवार येत.

माझ्याशी त्यांचा परिचय करून देताना गोखले म्हणाले, "हे प्राध्यापक राय. यांचा महिन्याचा पगार आठशे आहे. त्यांपैकी स्वतःसाठी फक्त चाळीस रुपये ठेवून, बाकीची सगळी रक्कम ते सार्वजनिक कार्याला अर्पण करतात. त्यांनी लग्न केलेलं नाही आणि ते करायची त्यांची इच्छाही नाही."

गोखले आणि डॉ. राय यांचं सर्व बोलणं समाजाच्या हितासंबंधी असे, त्याला मोठं शैक्षणिक मोल असे. त्यामुळं ते कितीही ऐकलं तरी माझी तृप्ती होत नसे.

गोखल्यांना कामात गढलेलं पाहणं हे जितकं आनंदाचं होतं, तितकंच शिकण्यासारखंही होतं. ते कधीही एक क्षणसुद्धा वाया घालवत नसत. त्यांनी जोडलेली सर्व नातीगोती आणि स्नेहसंबंध समाजहितासाठी होते. ते नेहमी

देशाच्या कल्याणासंबंधीच बोलत. असत्य, अप्रामाणिकपणा यांचा त्यांच्या बोलण्यात लवलेशही नसे. हिंदुस्थानचं दारिद्र्य कधी नाहीसं होईल आणि गुलामगिरीतून आपला देश कधी मुक्त होईल, हा एकच ध्यास त्यांना लागला होता. अनेक प्रकारचे लोक वेगवेगळ्या विषयांकडं त्यांचं लक्ष वेधण्याचा प्रयत्न करत; पण गोखले त्यांपैकी प्रत्येकाला एकच उत्तर देत – ती गोष्ट तुम्ही स्वतः करा, मला माझं काम करू द्या. मला जे हवं आहे, ते म्हणजे माझ्या देशाचं स्वातंत्र्य. ते एकदा मिळवलं, की मग आपल्याला इतर गोष्टींचा विचार करता येईल. तोवर माझी सगळी शक्ती आणि सगळा वेळ मी या एकाच कामासाठी देणार आहे.

न्या. रानड्यांविषयी गोखल्यांची पूज्यबुद्धी क्षणाक्षणाला दिसून येई. रानड्यांचा अधिकार ते प्रत्येक बाबतीत अंतिम मानत आणि त्याचा पावलोपावली उल्लेख करत. गोखल्यांकडं माझा मुक्काम असताना रानड्यांची पुण्यतिथी आली. गोखले ती दरवर्षी साजरी करत. त्या प्रसंगी माझ्याखेरीज त्यांचे काही मित्रही हजर होते. आपल्या भाषणात गोखल्यांनी रानड्यांच्या आठवणी सांगितल्या. त्या काळातल्या मोठ्या माणसांत अष्टपैलू बुद्धीचे अलौकिक पुरुष म्हणून रानडे सर्वश्रेष्ठ होते, असं ते म्हणाले. रानडे केवळ एक थोर न्यायमूर्ती नव्हते, तर ते तितकेच थोर इतिहासकार, अर्थशास्त्रज्ञ व समाजसुधारकही होते. त्यांच्या सखोल ज्ञानावर सगळ्यांचा इतका विश्वास होता, की सर्वजण त्यांचे निर्णय निःशंकपणे मान्य करत. आपल्या गुरूच्या अंगी एकवटलेल्या बुद्धीच्या व मनाच्या गुणांचं वर्णन करताना गोखल्यांच्या आनंदाला सीमा उरत नसे.

त्या काळात गोखले घोडागाडी वापरत. ते घोडागाडी का वापरत, हे मला माहीत नव्हतं. म्हणून मी एकदा त्यांना तक्रारीच्या स्वरात विचारलं, ''एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जायला तुम्हांला ट्रामगाडीचा उपयोग करता येणार नाही काय? त्यामुळं नेत्याच्या प्रतिष्ठेला कमीपणा येतो की काय?''

काहीसे व्यथित होऊन गोखले म्हणाले, ''एकूण तुम्हीसुद्धा मला समजून घेऊन शकला नाहीत तर! कायदेमंडळाचे माझे भत्ते मी वैयक्तिक सुखासाठी

खर्च करत नाही. ट्रामगाडीतून फिरण्याच्या तुमच्या स्वातंत्र्याचा मला हेवा वाटतो; पण मला तसं करता येत नाही याचा मला खेद वाटतो. माझ्याएवढी व्यापक प्रसिद्धी तुम्हांला मिळेल, तेव्हा ट्रामगाडीतून फिरणं तुम्हांलाही काही वेळा कठीण होऊन बसेल. नेते करतात ती प्रत्येक गोष्ट त्यांच्या स्वतःच्या सुखासाठी असते असं समजायचं कारण नाही. तुमच्या साध्यासुध्या सवयी मला आवडतात. शक्य तेवढ्या साधेपणानं मीही राहतो, पण माझ्यासारख्या माणसाला काही खर्च बहुधा अटळ असतो.''

अशा रीतीनं माझ्या तक्रारींपैकी एक त्यांनी समाधानकारकपणे निकालात काढली. पण माझी आणखी एक तक्रार होती आणि माझं समाधान होईल अशा रीतीनं त्यांच्याकडून तिचं मात्र निवारण झालं नाही. मी म्हणालो, ''तुम्ही फिरायलाही जात नाही, मग तुम्ही सदोदित आजारी असता, यात आश्चर्य कसलं? सार्वजनिक कार्यामुळं व्यायामाला वेळ उरू नये की काय?''

''फिरायला जाण्याइतका रिकामा तुम्ही मला कधी बघता का?'' ते म्हणाले.

मला गोखल्यांविषयी इतका आदर होता, की मी त्यांच्याशी कधी हुज्जत घातली नाही. त्यांच्या उत्तरानं माझं समाधान झालं नाही, तरी मी गप्प बसलो. कोणाला कितीही काम असो, त्यानं जेवणाप्रमाणंच व्यायामासाठीही थोडा वेळ काढायला हवा, अशी त्या वेळी माझी समज होती व आजही आहे. माझं असं नम्र मत आहे, की व्यायामानं कोणाचीही काम करण्याची कुवत कमी तर होत नाहीच, उलट ती वाढतेच.

पुढं १९१२ साली गोखल्यांनी दक्षिण आफ्रिकेला भेट दिली. आम्ही हिंदी लोकांनी आमच्या न्याय्य हक्कांसाठी तिथं जो लढा चालवला होता, त्याची समक्ष माहिती घ्यायला ते आले होते.

त्या वेळी त्यांनी एक उपरणं बरोबर आणलं होतं. ते त्यांना त्यांचे थोर गुरू न्या. रानडे यांनी भेट म्हणून दिलं होतं. गोखल्यांना त्याचं मोल फार मोठं होतं आणि ते त्याची जास्तीत जास्त काळजी घेत.

जोहान्सबर्गमधील भारतीयांनी त्यांच्या सन्मानार्थ दिलेली मेजवानी हा एक महत्त्वाचा प्रसंग होता. या खास प्रसंगी त्यांना ते उपरणं वापरायचं होतं; पण



त्याला सुरकुत्या पडल्या होत्या आणि इस्त्री करण्याची जरुरी होती. धुलाई-केंद्रात ते पाठवून वेळेवर परत मिळवणं शक्य नव्हतं.

कपडे स्वतः धुऊन त्यांना इस्त्री करण्याच्या कलेत तोपर्यंत मी पटाईत झालो होतो. म्हणून माझ्या या कलेचा त्या उपरण्यावर प्रयोग करण्याची परवानगी मी गोखल्यांकडं मागितली. तेव्हा गोखले म्हणाले, ''तुमच्या वकिलीच्या ज्ञानावर मी भरवसा ठेवू शकतो; पण धोबी म्हणून मात्र मला तुमच्यावर भरवसा ठेवता येत नाही. तुम्ही ते उपरणं खराब केलंत तर? मला ते किती मोलाचं वाटतं, हे तुम्हांला ठाऊक आहे काय?'' असं म्हणून रानड्यांकडून मिळालेल्या त्या भेटवस्तूची – त्या उपरण्याची – सर्व हकीकत त्यांनी मला हर्षभरानं सांगितली. तरीसुद्धा मी आग्रह धरला, चांगल्या कामाची हमी दिली आणि त्या उपरण्याला इस्त्री करण्याची परवानगी घेऊन नंतर त्यांची पसंतीही मिळवली.

**शब्दार्थ व टिपा :**

**पूज्यबुद्धी**–अतिशय आदर. **अष्टपैलू बुद्धी**–अनेक विषयांचे ज्ञान असलेली बुद्धी. **अर्थशास्त्र**–पैशाच्या व्यवहारासंबंधीचे शास्त्र. **व्यथित**–दुःखी.

**सीमा न उरणे**–मर्यादा नाहीशी होणे. अमर्याद होणे.

**दक्षिण आफ्रिकेतील गोऱ्या सत्तेचा अन्याय:** बॅरिस्टर ही पदवी मिळवून गांधीजी दक्षिण आफ्रिकेत वकिली करण्यासाठी गेले. दक्षिण आफ्रिकेचे सरकार तिथल्या हिंदी लोकांना मजूर म्हणून तुच्छतेने वागवी. हिंदी लोकांना जाचक असे अनेक कायदे त्या सरकारने केले होते. गांधीजींनी हिंदी लोकांना या वर्णविद्‌वेषाविरुद्‌ध संघटित करून त्यांना निर्भय बनवले आणि सत्याग्रहाचा लढा उभारला.

**फर्गसन कॉलेज**–टिळक–आगरकर आदींनी स्थापन केलेले पुण्यातील प्रसिद्‌ध महाविद्‌यालय. गोखले या महाविद्‌यालयात काही काळ प्राध्यापक होते.

**ट्रामगाडी**–मोठ्या शहरात जा-ये करण्यासाठी लोखंडी रुळांवरून विजेवर चालणारे सार्वजनिक वाहन.

**जोहान्सबर्ग**–दक्षिण आफ्रिकेतील एक मोठे शहर.

**प्रश्न :**

१. पहिल्याच भेटीत गांधीजी गोखल्यांकडे का आकर्षित झाले?
२. गांधीजींच्या कोणकोणत्या गुणांचे गोखल्यांनी कौतुक केले?
३. गांधीजींना डॉ. प्रफुल्लचंद्र राय यांची आठवण ठळकपणे का राहिली?
४. गोखल्यांना कोणता एकच एक ध्यास लागला होता?
५. न्या. रानडे यांच्या कोणत्या गुणांचा गोखल्यांवर प्रभाव पडला?
६. गोखल्यांच्या कोणत्या उत्तराने गांधीजींचे समाधान झाले नाही? का?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'रानडे – गोखले', 'गोखले – गांधी' या गुरुशिष्यांच्या प्रसिद्‌ध जोड्या आहेत. अशा आणखी काही थोर गुरुशिष्यांच्या जोड्यांची माहिती मिळवा.
२. 'पुण्यतिथी' हा शब्द या पाठात आला आहे. तसाच 'जयंती' हा शब्द आहे. त्यांच्या अर्थातील फरक समजून घ्या आणि त्यांचा वाक्यांत उपयोग करा.
३. रानडे, गोखले, गांधी या राष्ट्रीय नेत्यांची नावे या पाठात आली आहेत. त्यांची आणि आणखी काही राष्ट्रीय नेत्यांची चित्रे मिळवून त्यांचे प्रदर्शन मांडा.

***



# २० सर्व धर्मांची शिकवण सारखीच

## यदुनाथ थत्ते

**यदुनाथ दत्तात्रय थत्ते** (जन्म: १९२२) 'साधना' साप्ताहिकाचे माजी संपादक. राष्ट्रीय एकात्मतेसाठी सानेगुरुजींनी स्थापना केलेल्या 'आंतर भारती' चे सचिव. अनेक सामाजिक कार्यांत सहभाग. मुलांसाठी बरीच लहानमोठी पुस्तके लिहिली आहेत. 'आपला मान – आपला अभिमान', 'समर्थ व्हा – संपन्न व्हा', 'सोन्या', 'वाळवंटातील झरे', 'जग्गूबाबा' ही त्यांपैकी काही पुस्तके.

आचार्य विनोबा भावे हे एक आधुनिक संत होते. सर्वधर्मसमभावाचे व्रत त्यांनी निष्ठेने चालवले आणि त्याची शिकवण दिली. त्यांनी हे व्रत कसे चालवले ते या पाठात वाचा.

**महात्मा** गांधींच्या सूचनेवरून सत्याग्रह-आश्रम सुरू करण्यासाठी विनोबा १९२१ साली पाडव्याच्या दिवशी वर्ध्याला आले.

आश्रमात सर्वांना मुक्तद्वार असे. जात, धर्म, वंश, भाषा, देश अशा कोणत्याही कारणाने आश्रमात प्रवेश नाकारला जात नसे. विनोबा हे एक हाडाचे शिक्षक असल्याने अनेक ठिकाणांहून विद्यार्थी शिकण्यासाठी त्यांच्याकडे येत.

गीतेवर विनोबांचे प्रेम होते. आपली आई जाताना गीतेच्या ओटीत आपल्याला घालून गेली, अशी त्यांची भावना. ते म्हणत, 'आईच्या दुधावर मी पोसलो आहे, त्यापेक्षा गीतेच्या दुधावर अधिक पोसलो आहे.' संस्कृत गीता समजायला कठीण, म्हणून त्यांनी गीतेचा पद्यमय सुबोध मराठी अनुवाद केला. 'गीताई' या नावाने तो प्रसिद्ध आहे.

आश्रम-जीवनासाठी गांधीजींनी काही व्रते घालून दिली. सर्वधर्मसमभाव हे त्यांतले एक व्रत. त्या व्रताचे पालन करायचे तर सर्व धर्मांची माहिती हवी. विनोबांनी विविध धर्मांबद्दलची अनेक पुस्तके वाचली होती. सत्य-प्रेम-करुणा हाच सर्व धर्मांचा गाभा आहे, असे अभ्यासानंतर त्यांचे मत बनले.



माणसाने माणसाशी माणसासारखे वागावे, हीच सर्व धर्मांची शिकवण आहे. विनोबा आश्रमातील मुलांना हेच शिकवत असत.

१९३५ सालच्या जूनमध्ये हैदराबादहून एक मुसलमान मुलगा आश्रमात आला. एक दिवस तो विनोबांकडे येऊन म्हणाला, ''तुम्ही गीता शिकवता, पण मला कुराण शिकवाल का?''

विनोबांनी कुराणाचा अभ्यास केला होता. इंग्रजी व इतर भाषांतील कुराणावरची अनेक पुस्तके त्यांनी वाचली होती. पण मूळ अरबी कुराण त्यांनी वाचले नव्हते. त्या मुलासाठी त्यांनी मुळातून कुराणाचा अभ्यास करायचे ठरवले. त्यांनी आसपास शोध घेतला, तेव्हा त्यांना कळले, की एका शिक्षकांकडे मूळ अरबी कुराण आहे. विनोबांनी त्यांना गाठले. ते विनोबांना म्हणाले, ''माझ्यापाशी कुराणाची अरबी प्रत आहे. तिचं पठणही मी करतो; परंतु मला अरबी समजत नाही. त्यामुळं कुराणातील 'आयतां'चा म्हणजे वचनांचा अर्थ लावता येत नाही. अरबीचे शुद्ध उच्चारही मला येत नाहीत.''

हे ऐकून विनोबांना वाईट वाटले. संतांनी लोकभाषेतच धर्मविचार का मांडला याचे रहस्य त्यांना उमगले. कुराणाबाबतही तसे केले पाहिजे असे त्यांच्या मनाने घेतले.

त्यांनी अरबी भाषेचा अभ्यास सुरू केला. शब्दकोश आणले. आकाशवाणीवरच्या कुराणपठणावरून अरबीचे उच्चार त्यांनी आत्मसात केले. विनोबांनी मौलाना आझादांचा कुराणावरील प्रसिद्ध ग्रंथही अभ्यासला.

विनोबा अरबीतून मूळ कुराणाचा अभ्यास करत आहेत हे गांधीजींना कळले, तेव्हा त्यांना फार आनंद झाला. ते म्हणाले, ''सर्वधर्मसमभाव हे आश्रमातले एक व्रत आहे. त्या दृष्टीनं कुराणाचा मुळातून अभ्यास आपल्यापैकी कोणीतरी करायलाच हवा होता. विनोबा तो करत आहेत, ही फार आनंदाची गोष्ट आहे.''

मौलाना आझाद एकदा वर्ध्याला आले असता विनोबांच्या कुराणाच्या अभ्यासाची चाचणी त्यांनी घेतली. विनोबा हे 'आलीम' म्हणजे विद्वान आहेत, असे ते म्हणाले.

गांधीजींच्या रोजच्या प्रार्थनेत कुराणातला काही भाग समाविष्ट झाला होता. मूळ अरबीतूनच तो म्हटला जात असे. विनोबांच्या मनात आले, त्याचा मराठी अनुवाद केला तर अनेकांना त्याचा लाभ मिळेल. संतांचे साहित्य विनोबांनी बारकाईने वाचले होते. संतांची प्रासादिक शैली त्यांनी आत्मसात केली होती. त्या शैलीत त्यांनी अनुवाद केला. तो विनोबांच्या तोंडून ऐकण्यात एक वेगळाच आनंद वाटे.

अनेक ठिकाणी विनोबांनी कुराणावर प्रवचने दिली. काही मुसलमान त्यांना 'वली' म्हणजे साधू म्हणू लागले. विनोबा म्हणत, 'ही तर खुदाची बंदगी आहे!'

विनोबा काश्मीरमध्ये गेले असता भटुंडी गावच्या मुसलमानांनी त्यांना आग्रहाने आपल्या गावी बोलावले. विनोबा त्यांना म्हणाले, ''जो स्वतः चांगले काम करतो आणि इतरांकडून करून घेतो, तोच देवाला प्रिय होतो.''

विनोबांचे निधन झाले तेव्हा भटुंडीचे चौधरी अहमदीन पवनारला गेले आणि विनोबांसाठी त्यांनी 'यासिन सूरत' पढली आणि त्यांच्यासाठी परमेश्वराची करुणा भाकली.

कुराणाप्रमाणेच विनोबांनी गीता, बायबल, धम्मपद, ग्रंथसाहेब अशा इतर अनेक धर्मग्रंथांचे सार मराठीत आणले आहे. ते वाचले म्हणजे सर्व धर्मांची शिकवण सारखीच आहे, ही गोष्ट ध्यानी येते.



**शब्दार्थ व टिपा :**

**प्रासादिक**–सुबोध व रसाळ. **शैली**–लेखन, चित्र आदी कलांची खास विशिष्ट पद्धती. **बंदगी**–सेवा. **ओटीत घालणे**–संगोपनासाठी दुसऱ्याच्या हवाली करणे.

**आत्मसात करणे**–पूर्णपणे माहीत करून घेणे.

**यासिन सूरत**–मृतासाठी म्हणायची कुराणातील प्रार्थना.

**प्रश्न :**

१. गीतेच्या दुधावर आपण अधिक पोसलो आहोत, असे विनोबांनी का म्हटले आहे?
२. विनोबांनी कुराणाचा अभ्यास का सुरू केला?
३. 'कुराणसार' लिहिण्यासाठी त्यांनी कोणती पूर्वतयारी केली?
४. सर्व धर्मांची शिकवण कोणती आहे, असे विनोबांनी सांगितले आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. ओटीत घालणे, आत्मसात करणे या वाक्प्रचारांचा उपयोग करून वाक्ये तयार करा आणि ती लिहा.
२. हाडाचे शिक्षक म्हणजे जन्मजात मुरब्बी शिक्षक. 'हाडाचा' या शब्दाचा या अर्थाने वेगवेगळ्या शब्दांबरोबर उपयोग करून वाक्ये तयार करा.
३. विनोबांनी मराठीत सर्वधर्म-प्रार्थना तयार केली आहे. ती मिळवून पाठ करा आणि रोज म्हणा.
४. 'माणसाने माणसाशी माणसासारखे वागावे, हीच सर्व धर्मांची शिकवण आहे.' हे सुभाषितवजा वाक्य सुबक अक्षरांत लिहून नक्षीदार पट्टी तयार करा आणि ती वर्गात लावा.

***



# २१ विचारधन

## १. देशबांधवांसाठी झटत राहा



सुरुवातीपासून अनेक वेळा माझ्यावर निराशेचे प्रसंग आले. माणूस मोडून पडावा अशा निराशेच्या वावटळीत मी सापडलो; पण मी कधी हताश झालो नाही. आशा आणि उमेद घेऊन मी तुमच्यापुढे उभा आहे. निरंतर कष्ट आणि धडपड हे शब्द मी आत्मसात केले आहेत. माझा आशावाद त्यामुळे कधी लोपत नाही. देशाला आणि देशबांधवांना भक्तिप्रेमाचे चार शब्द मला सांगावेसे वाटतात. एकी करा, जतन करा. दारिद्र्याखाली चिरडलेल्या, उपासपोटी कोट्यवधी बांधवांना दिलासा देण्यासाठी स्वराज्य आहे, हे विसरू नका. जगातील पुढारलेल्या देशांच्या मालिकेत पुन्हा आपला देश सन्मानाने विराजमान व्हावा म्हणून झटत राहा.

– दादाभाई नौरोजी

## २. तरुणांना संदेश

तरुण पिढीने आपण केवळ हिंदी आहोत एवढे ध्यानात ठेवावे. एकी करावयाची ती केवळ महाराष्ट्रापुरतीच करू नये, प्रांतिक भेद व मत्सर यांना आपणांमध्ये येऊ देऊ नये. महात्मा गांधी तर विश्वकुटुंबीच आहेत. तरुणांनी आपला दिलदारपणा विश्वकुटुंबीयत्वाला शोभेल असाच ठेवला पाहिजे. भवितव्य जर एवढे विशाल आहे, तर तरुणांनी मी ब्राम्हण, मी ब्राम्हणेतर असे

सटरफटर भेद लक्षात का आणावे? हा सटरफटरपणा टाकला पाहिजे. हिंदुस्थानने जगाला धडा घालून दिला आहे, असे एका तोंडाने म्हणावयाचे आणि आपल्यातच सोवळेपणा ठेवावयाचा, हा दुटप्पीपणा आहे. त्यापासून तरुणांनी सावध राहावे. जुन्याचा सर्वच त्याग करावा असे कोणीही म्हणत नाही; पण ते नव्याच्या कसाला लावावे. ते म्हाताऱ्यांकडून होत नाही. या दिव्यातून तरुण पार पडले, म्हणजे म्हातारे त्यांना आशीर्वाद देण्यास पुढे येतीलच. तेव्हा तरुणांनी विनय न टाकता शिस्तीने व श्रद्धेने सुधारणेच्या कामाला पुढे यावे, हा माझा त्यांना नम्रपणाचा संदेश आहे.



– विठ्ठल रामजी शिंदे

---

## ३. सत्संग

दुसऱ्या माणसाने आपल्या तंत्राने वागावे अशी इच्छा असणे हे मी जुलमीपणाचे लक्षण समजतो. शिवाय त्यात सदभिरुची व संस्कारिता यांचा अभाव आहे. आपल्यासारखी सगळी माणसे व्हावी, असे ज्याला वाटते, त्याला जगात स्वत:पेक्षा चांगले कोणीच दिसत नसले पाहिजे. अशा नतद्रष्टाला काय म्हणावे? सगळी माणसे माझ्याच तंत्राने वागू लागली तर त्यांच्या संगतीपासून लाभ तर राहोच, पण आनंद तरी मिळेल का?



एकमेकांच्या गुणदोषांमुळे व स्वभावभेदांमुळे परस्परांचे व्यक्तित्व व्यापक व संपन्न बनते. भिन्न स्वभावापासून लाभ होणे यालाच सत्संगाचा महिमा किंवा सहवासापासून फायदा म्हणतात. दरेकाच्या स्वभावातील खुब्या, मखड्या आणि बऱ्या किंवा वाईट लकेरी इस्त्री फिरवून सारख्या करून घेण्यात काहीच गोडी नाही. दरेकाच्या व्यक्तित्वातील हे विशेष टिकू दिले पाहिजेत.

– आचार्य दादा धर्माधिकारी

---

## ४. अभिमान कशाचा बाळगावा?



परंपरेचा अभिमान हा दोन अर्थांनी वापरला जातो. पैकी पहिला अर्थ समाजात जे जे जुने आहे, परंपरेने चालत आलेले आहे, त्या सर्वांचा अभिमान असा आहे. या अर्थाने पाहिले, म्हणजे परंपरा आणि रूढी या समाज-सुधारणेच्या मार्गातील फार मोठा अडथळा आहेत ही गोष्ट उघड होते. पण याखेरीज अजून एक दुसरा अर्थ त्याला आहे. परंपरेने ज्या चालत आलेल्या असतात त्या सगळ्याच गोष्टी वाईट नसतात; काही गोष्टी तर चांगल्या आणि वाईट अशा मिश्र असतात. काहींचे परंपरेत फक्त उच्चार असतात, आचार नसतात. या सर्वांची निवड करून मागचे काय चालू ठेवायचे आणि काय बदलायचे हे प्रत्येक समाज ठरवतो. कोणत्याही समाजाला आपला भूतकाळ एकाएकी पूर्णपणे मोडता येत नाही. कोणताही समाज जे स्वीकारण्याजोगे ठरवतो तेवढ्याच परंपरेचा अभिमान बाळगायचा असतो.

– नरहर कुरुंदकर

* * *



# १ नव्या जगाचे नायक आम्ही

## वसंत बापट

**विश्वनाथ वामन बापट :** (जन्म : १९२२) कवी, प्रवासवर्णनकार. 'बिजली', 'सेतू', 'अकरावी दिशा', 'मानसी', 'प्रवासातल्या कविता' इत्यादी कवितासंग्रह. 'बारा गावचे पाणी' हे प्रवासवर्णन.

हे गीत 'शिंग फुंकिले रणी' या समूहगीतांच्या संग्रहातून घेतले आहे. अंधश्रद्धा व जुन्या अडाणी समजुती यांचा त्याग करून नव्या विज्ञाननिष्ठ विचारांचे स्वागत केले पाहिजे, हा विचार या कवितेत आग्रहाने मांडला आहे.



गतकाळाची होळी झाली, धरा उद्याची उंच गुढी
पुराण तुमचे तुमच्यापाशी, ये उदयाला नवी पिढी
　　ही वडिलांची वाडी तुमची, तुम्हांस ती लखलाभ असो
　　खुशाल फुटक्या बुरुजावरती पणजोबांचे भूत वसो
चंद्रावरती महाल बांधू, नको अम्हांला जीर्ण गढी



देव्हाऱ्यातिल गंधफुलांतच झाकुन ठेवा ती पोथी
अशी बुद्धिला भूक लागता कशी पुरेल अम्हा बोथी
रविबिंबाच्या घासासंगे हवी कुणाला शिळी कढी!
शेषफणेवर पृथ्वी डोले! मेरूवरती सूर्य फिरे!
स्वर्गामध्ये इंद्र नांदतो! चंद्र राहुच्या मुखी शिरे!
काय अहाहा बालकथा या एकावरती एक कडी
दहा दिशांतुन अवकाशातुन विमान अमुचे भिरभिरते
अणुरेणुंचे ग्रहगोलांचे रहस्य सारे उलगडते
नव्या जगाचे नायक आम्ही, तुम्ही पुजावी जुनी मढी

**शब्दार्थ व टिपा :**

**जीर्ण गढी**–जुनाट किल्लेवजा वाडा. **बोथी**–लहान मुलाच्या तोंडात द्यायचे रबरी चोखणे. **एकावर एक कडी**–एकापेक्षा एक वरचढ. **अणुरेणू**–अतिशय सूक्ष्म कण.

**होळी होणे**–जळून नष्ट होणे. **गुढी धरणे** (किंवा उभारणे)–नव्या उपक्रमाला सुरुवात करणे. **तुमची तुम्हांला लखलाभ असो**–तुमची तुम्हांला लाभो, आम्हांला नको. (हा वाक्प्रचार उपरोधाने वापरला जातो.)

**रविबिंबाचा घास**–जन्मल्याबरोबर आकाशात उड्डाण करून सूर्यबिंबाचा घास घेण्यासाठी मारुती झेपावला अशी पुराणकथा आहे. यावरून वैज्ञानिक पराक्रमाची झेप सूचित केली आहे.

**'शिळी कढी'** व **'जुनी मढी'** हे शब्द 'जुन्या, टाकाऊ गोष्टी' या अर्थाने कवीने वापरले आहेत.

**'शेषफणेवर... मुखी शिरे'**–शेष नावाच्या नागाच्या फणीवर पृथ्वी तोलली आहे, मेरुपर्वतावर सूर्य गोल फिरतो, स्वर्गाचा राजा इंद्र आहे, चंद्रग्रहण लागते म्हणजे चंद्राला राहू गिळतो अशा विज्ञाननिष्ठ बुद्धीला न पटणाऱ्या कथा पुराणात आहेत.

**प्रश्न :**

१. गतकाळातील कोणत्या गोष्टींचा कवी धिक्कार करतो?
२. पुराणातील कल्पनांना 'बालकथा' असे का म्हटले आहे?
३. या कवितेत नव्या जगाची कोणती वैशिष्ट्ये सांगितली आहेत?
४. कवीने 'आम्ही', 'तुम्ही' असे शब्द वापरले आहेत, ते कोणाला उद्देशून आहेत?
५. 'नव्या जगाचे नायक आम्ही' असे कवीने का म्हटले आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. हे एक समूहगीत आहे. योग्य चाल लावून ते पाठ करा व म्हणा.
२. या कवितेत बुद्धीला न पटणाऱ्या काही पुराणातील कथांचा उल्लेख आहे. उदा. चंद्राला राहू गिळतो. तुम्हांला अशाच प्रकारच्या कोणत्या कथा माहीत आहेत? त्या तुम्हांला का पटत नाहीत, ते सांगा.

* * *



# २ आनंदी पक्षी

## बालकवी

**त्र्यंबक बापूजी ठोमरे** (जन्म : १८९०; मृत्यू : १९१८.) बालवयात कवितालेखनाला प्रारंभ. १९०७ साली जळगाव येथे भरलेल्या पहिल्या कविसंमेलनात 'बालकवी' म्हणून गौरव. 'बालकवींची कविता' हा कवितासंग्रह. निसर्गाच्या उत्कट ओढीतून बालकवींची कविता निर्माण झाली आहे. त्यांनी रेखाटलेली निसर्गाची सुंदर चित्रे मनाला भारून टाकतात.

या कवितेत निसर्गाच्या रम्य सहवासात आनंदाने भराऱ्या मारणारा एक चिमुकला पक्षी बालकवींनी रंगवला आहे. त्या पक्ष्याला पाहून कवीचे मन आनंदाने उचंबळून येते आणि पक्ष्याची ती आनंदी वृत्ती त्यालाही हवीहवीशी वाटते.

केव्हा मारुनि उंच भरारी। नभात जातो हा दूरवरी,
आनंदाची सृष्टी सारी। आनंदे भरली.

आनंदाचे फिरती वारे। आनंदाने चित्त अवसरे,
आनंदे खेळतो कसा रे। आनंदी पक्षी!

हिरवे हिरवे रान विलसते। वृक्षलतांची दाटी जेथे,
प्रीती शांती जिथे खेळते। हा बसतो तेथे.

सुंदर पुष्पे जिथे विकसली। सरोवरी मधु कमले फुलली
करीत तेथे सुंदर केली। बागडतो छंदे.







हासवितो लतिकाकुंजांना । प्रेमे काढी सुंदर ताना,
आनंदाच्या गाउन गाना । आनंदे रमतो.
जीवित सारे आनंदाचे । प्रेमरसाने भरले त्याचे,
म्हणोनिया तो रानी नाचे । प्रेमाच्या छंदे!
बा आनंदी पक्ष्या, देई । प्रसाद अपुला मजला काही,
जेणे मन हे गुंगुन जाई । प्रेमाच्या डोही.
उंच भराऱ्या मारित जाणे । रूप तुझे ते गोजिरवाणे!
गुंगुन जाइल चित्त जयाने । दे, दे ते गाणे!

**शब्दार्थ व टिपा :**

**अवसरणे**–ओसंडून वाहणे. **वसणे**–राहणे; वस्ती करणे. **केली**–क्रीडा. **प्रसाद**–कृपा; आशीर्वाद.

**प्रश्न :**

१. पक्ष्याचा आनंद त्याच्या कोणत्या कृतींमधून कवीला जाणवतो?
२. आनंदी पक्ष्याला कुठे कुठे राहणे आवडते?
३. पक्ष्याकडे कवीने काय काय मागितले आहे? कशासाठी?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'हिरवे हिरवे रान' येथे 'हिरवे' हा शब्द दोनदा वापरला आहे. त्याचा अर्थ अतिशय गडद हिरव्या रंगाचे रान. अशा प्रकारचे आणखी काही शब्द सुचवा.
२. बालकवींची 'आनंदी आनंद गडे' ही कविता मिळवून वाचा व पाठ करा.

* * *



# ३ सागर

कुसुमाग्रज

**विष्णू वामन शिरवाडकर :** (जन्म : १९१२) कवी, नाटककार. 'विशाखा', 'किनारा', 'मराठी माती' इत्यादी कवितासंग्रह. 'कौंतेय', 'दुसरा पेशवा', 'नटसम्राट' इत्यादी नाटके. उत्कट राष्ट्रप्रेम, समाजाबद्दल विशेष आस्था, तीव्र कल्पनाशक्ती, अलौकिकतेची व भव्यतेची ओढ ही त्यांच्या कवितेची ठळक वैशिष्ट्ये आहेत.

ही कविता १९७२च्या 'किशोर' दिवाळी अंकातून घेतली आहे. मुलाच्या डोळ्यांनी सागराकडे पाहून कवीच्या मनात जे विचार उचंबळून आले, ते या कवितेत व्यक्त झाले आहेत.



आवडतो मज अफाट सागर
अथांग पाणी निळे
निळ्याजांभळ्या जळात केशर
सायंकाळी मिळे.

फेसफुलांचे सफेत शिंपित
वाटेवरती सडे
हजार लाटा नाचत येती
गात किनाऱ्याकडे.

मऊ मऊ रेतीत कधी मी
खेळ खेळतो किती
दंगल दर्यावर करणाऱ्या
वाऱ्याच्या संगती.

संथ सावळी दिसती केव्हा
क्षितिजावर गल्बते
देश दूरचे बघावयाला
जावेसे वाटते.

तुफान केव्हा भांडत येते
सागरही गर्जतो
त्या वेळी मी चतुरपणाने
दूर जरा राहतो.

खडकावरुनी कधी पाहतो
मावळणारा रवी
ढगाढगाला फुटते तेव्हा
सोनेरी पालवी.

प्रकाशदाता जातो जेव्हा
जळाखालच्या घरी
नकळत माझे हात जुळोनी
येती छातीवरी.

**शब्दार्थ व टिपा :**

**अथांग**–ज्याचा तळ लागत नाही असे – खूप खोल.

**प्रकाशदाता**–प्रकाश देणारा – (सूर्य).

**प्रश्न :**

१. कवीला वाटणारी भव्यतेची ओढ कोणकोणत्या कल्पनांमधून दिसून येते?
२. 'जळात केशर सायंकाळी मिळे,' असे का म्हटले आहे?
३. मऊ रेतीत हा मुलगा कुणाबरोबर खेळ खेळतो?
४. दूर देशी जावे असे त्याला केव्हा वाटते?
५. 'चतुरपणाने दूर जरा राहतो,' यातील चातुर्य कोणते?
६. कोणते सुंदर दृश्य पाहून मुलगा वंदन करतो?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. या कवितेतील तुम्हांला आवडणारी कल्पना कोणती? ती तुमच्या शब्दांत लिहा.
२. इथे निसर्गचित्रात अनेक रंगांचा उल्लेख आहे. ते सर्व रंग शोधा व ते ज्या वस्तूंबद्दल आले आहेत ते लक्षात घेऊन त्यांच्या जोड्या लावा.
३. तुमच्या गावाजवळच्या एखाद्या सुंदर स्थळाला भेट द्या आणि त्यासंबंधी एक परिच्छेद लिहा.

* * *



# ४ समाधी

## ना. घ. देशपांडे

**नागोराव घनश्याम देशपांडे** (जन्म : १९०९) 'शीळ', 'अभिसार' हे कवितासंग्रह. त्यांच्या अनेक कवितांना ग्रामीण जीवनाची पार्श्वभूमी आहे. निसर्गाची सुरेख शब्दचित्रे त्यांत आढळतात.

हो कविता 'शीळ' या संग्रहातून घेतली आहे. दूर रानात ओसाड जागी कवीला पडझड झालेली एक समाधी दिसते. त्या समाधीचे वर्णन करून कवीने आपल्या मनातील खिन्नता येथे व्यक्त केली आहे.

या दूरच्या दूर ओसाड जागी
किडे-पाखरांवीण नाही कुणी;
हा भूमिकाभाग आहे अभागी:
इथे एक आहे समाधी जुनी.

विध्वंसली काळहस्तांमुळे ही:
हिला या, पहा, जागजागी फटा;
माती, खडे आणि आहेत काही
हिच्याभोवती भंगलेल्या विटा!



आहे जरी लेख हा, छेद गेला –
जुन्या अक्षरांतील रेघांमधून;
दुर्वांकुरे अन् तरू खुंटलेला
निघाला थरांतील भेगांमधून.

कोठून ताजी फुले, बाभळींनी –
हिला वाहिले फक्त काटेकुटे;
ही भंगलेली शलाका पुराणी:
कुणाचे तरी नाव आहे इथे.

रानातला, ऊन, मंदावलेला,
उदासीन वारा इथे वाहतो;
फांदीतला कावळा कावलेला
भुकेलाच येथे-तिथे पाहतो!

**शब्दार्थ व टिपा :**

**भूमिकाभाग**–जमिनीचा भाग. **विध्वंसणे**–पडझड होणे; नाश होणे. **काळहस्त**–काळाचा हात – सर्वनाशी काळाचा घाला. **भंगलेली**–फुटलेली.

**प्रश्न :**

१. समाधी पाहून कवीला दुःख का झाले?
२. काळाच्या प्रभावामुळे समाधीच्या रूपात कोणकोणते बदल झाले?
३. भोवतालचा निसर्गही या समाधीची उपेक्षा करतो, हे कोणकोणत्या ओळींतून तुमच्या लक्षात येते?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. ही कविता वाचताना कवीचे अंतःकरण दुःखी आहे, हे कोणत्या शब्दांतून लक्षात येते ते सांगा.
२. 'अभागी भूमिकाभाग', 'काळहस्त', 'भंगलेली शलाका', 'कावलेला कावळा' यांचा अर्थ समजावून घ्या.
३. तुमच्या गावात एखादे प्राचीन देऊळ, एखाद्या सत्पुरुषाची समाधी अथवा कबर असेल, तर तेथे गेल्यावर तुमच्या मनात कोणते विचार येतात ते लिहा.

* * *



# ५ मानवांनो आत या रे

विंदा करंदीकर

**गोविंद विनायक करंदीकर** (जन्म : १९१८) कवी, ललित निबंधकार. 'मृद्‌गंध', 'जातक', इत्यादी कवितासंग्रह. 'सशाचे कान', 'अजबखाना', 'राणीचा बाग' इत्यादी बालगीतांचे संग्रह. 'स्पर्शाची पालवी', 'आकाशाचा अर्थ' हे ललितलेखांचे संग्रह.

ही कविता त्यांच्या 'स्वेदगंगा' या काव्यसंग्रहातून घेतली आहे. कवीला दीन-दुबळ्यांविषयी वाटणारी सहानुभूती या कवितेत प्रकट झाली आहे.

पर्वतांनो दूर व्हा रे! सागरांनो दूर व्हा रे!
उघडिले मी दार माझे; मानवांनो आत या रे.
वादळांची काय भीती?
तीच माझे गीत गाती.
वादळांना जन्म देती, श्वास माझे पेटणारे.
भूक माझी वाढलेली;
प्राण माझा वाढलेला;
वाढलेले पंख माझे, या नभी ना मावणारे.



कालसर्पाला अता मी
जिंकिले जाऊन व्योमी!
वीज ही रे चोच माझी, मेघ हे माझी पिसे रे.
आज माझा देह साधी
विश्वऐक्याची समाधी,
कोंडले जातील आता, मानवा या कोंडणारे.
दुर्बलांना, दुःखितांना,
शापितांना, शोषितांना,
आज क्षितिजाच्या करांनी देत मी आलिंगना रे.

**शब्दार्थ व टिपा :**

**कालसर्प**–काळ हाच जणू विळखा घालणारा एक साप. **व्योम**–आकाश. **शापित**–शाप मिळालेला; कर्तृत्व असूनही संधी न मिळालेला. **शोषित**–एका विशिष्ट वर्गाकडून पिळवणूक होऊन नाडलेला, गांजलेला.

**विश्वऐक्याची समाधी**–साऱ्या विश्वाशी समरस होणारी मनाची स्थिती.

**पर्वत, सागर**–माणसामाणसांत दुरावा निर्माण करणाऱ्या प्रचंड अडचणी अशा अर्थाने कवीने हे शब्द वापरले आहेत.

**वादळ**–कोणत्याही नवीन सामाजिक विचारावर रण माजून होणारा विरोध.

**प्रश्न :**

१. कवी कुणाला आमंत्रण देत आहे? का?
२. कवीला वादळाची भीती का वाटत नाही?
३. कुणाला आलिंगन द्यावेसे कवीला वाटते? का?
४. कवितेत गरुड पक्षी सूचित केला आहे, हे कोणत्या ओळींतून तुम्हांला जाणवते?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'कोंडले जातील आता मानवा या कोंडणारे' या ओळीतील कल्पना समजावून घ्या.
२. ही एक जोशपूर्ण कविता आहे. तिला योग्य चाल लावा आणि वर्गात सर्व मिळून म्हणा.

* * *



# ६ रानातली अंगाई

## ग. दि. माडगूळकर

**गजानन दिगंबर माडगूळकर** (जन्मः १९१९; मृत्यूः १९७८) कवी, चित्रपटकथालेखक आणि कथाकार. 'चैत्रबन', 'जोगिया' हे त्यांचे कवितासंग्रह. त्यांचे 'गीतरामायण' अतिशय लोकप्रिय आहे. त्याचे इतर भाषांतही अनुवाद झाले आहेत. 'रामजोशी', 'पेडगावचे शहाणे', 'ऊन-पाऊस' इत्यादी अनेक चित्रपटांच्या कथा, संवाद आणि गीते त्यांनी लिहिली आहेत.

ही कविता 'जोगिया' या कवितासंग्रहातून घेतली आहे. आपल्या लहानग्याला शांत झोप लागावी म्हणून त्याला थोपटत आई अंगाईगीत गाते. असेच हे एक अंगाईगीत आहे.



झोपडीच्या झापाम्होरं,
कसं चांदणं टिप्पूर
वाऱ्यासंगं हेलावतो,
उभ्या चिंचेचा मोहोर

सभोवार काळं रान,
गेलं दुधात भिजून

रानवेलींची लेकरं,
त्यास चाटती निजून.

उगड्या या गव्हाणीशी
बैल करीती रवंथ

करी रानाची राखण,
मोत्या जागत, पेंगत.

बाळा, दमून भागून
तुझं वडील झोपलं

नको करू किरकीर
झोप उगीच मोडंल.

**शब्दार्थ व टिपा :**

**अंगाई**–बाळाला झोपवताना आई लडिवाळपणे म्हणते ते गाणे.

**झाप**–झोपडीचे दार. **चिंचेचा मोहोर**–चिगूर. **गव्हाण**–गुरांना चारा घालण्याची गोठ्यातली जागा.

**प्रश्न :**

१. या कवितेला 'रानातली अंगाई' असे शीर्षक का दिले आहे?
२. 'दूध' या शब्दाने काय सूचित केले आहे?
३. झोपडीभोवतालच्या कोणकोणत्या गोष्टींचे वर्णन इथे केले आहे?
४. बाळाने किरकिर करू नये असे आईला का वाटते?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. तुम्ही काही अंगाईगीते ऐकली असतील. अशी काही अंगाईगीते मिळवा. ती वर्गात चालीवर म्हणून दाखवा.
२. या अंगाईगीताला साधी पण सुंदर चाल लावा व ते पाठ करा.
३. चांदण्या रात्रीचे वर्णन तुमच्या शब्दांत करा.

***



# ७ मोन्याची बल्हारी

## सोपानदेव चौधरी

**सोपानदेव नथुजी चौधरी** (जन्मः १९०७; मृत्यूः १९८३.) 'अनुपमा', 'सोपानदेवी' इत्यादी कवितासंग्रह. ग्रामीण वातावरणातले अनेक प्रसंग त्यांनी आपल्या अनेक कवितांतून रंगवले आहेत. त्यांनी काही कविता अहिराणी बोलीत लिहिल्या आहेत.

घरच्या गाईगोऱ्ह्यांवर शेतकऱ्याचे आपल्या लहान मुलाइतकेच प्रेम असते. या कवितेत एक शेतकरी आपल्या 'मोन्या' नावाच्या गोऱ्ह्याचे कसे कौतुक करीत आहे, पाहा.

माझ्या मोन्याची काय सांगू बल्हारी!
घरच्या गायचा पहिला गोऱ्हा
याचा मायसरका चेहरा
शिंगायचीबी तशीच तऱ्हा
डोये भरीसन पहाय जरा, थाट सरदारी
आताशीक गेलसालि नाथला
दोन रोज कहनाले जूपला
गाडीले चटकन् तयार झाला
असा गुनी हा लाल मियाला, चन्का भारी
कामामधी तर हा अवकायी
पयाच्या बाबे बाका लई



आगीनगाडीले बदनार नही
तऱ्हाच याची सम्दी नयी, दुडकी मारी.
धन्यासाठी तर कायिज तुटे
चाहुल येता माही कुठे
चटकन आंधी मोऱ्या उठे
भवति पाहतो आठे तठे, कान टवकारी
हांबा हांबा दे ललकारी
दररोज माले जागं करी
म्हने, 'करीसन घ्या न्याहरी
चाला हो मालक शेतावरी, रामपहारी.'

## शब्दार्थ व टिपा :

**बल्हारी**–मोठेपणा; सामर्थ्य. **नाथणे**–वेसण घालणे. **चनका**–चपळ. **अवकायी**–अवखळ. **पयाच्या बाबे**–पळण्याच्या बाबतीत. **दुडकी**–दुडदुड (चाल).

## प्रश्न :

१. मोऱ्याचा चेहरामोहरा कोणासारखा आहे?
२. कवी मोऱ्याला 'गुनी लाल' का म्हणतो?
३. मोऱ्याच्या धावण्याची तुलना कशाशी केली आहे?
४. धन्याबद्दल त्याला वाटणारे प्रेम त्याच्या कोणत्या वागण्यातून व्यक्त होते?
५. तो आपल्या धन्याला सकाळच्या वेळी काय काय करायला सांगतो?
६. मोऱ्याबद्दल धन्याला वाटणारे वात्सल्य कोणकोणत्या शब्दांतून आपल्याला जाणवते?

## स्वाध्याय व उपक्रम :

ही कविता अहिराणी बोलीत लिहिली आहे. मागच्या वर्षी तुम्ही 'खोप्यामंदी खोपा' ही बहिणाबाई चौधरींची कविता वाचली होती. 'भरीसन' म्हणजे 'भरून', 'मियाला' म्हणजे 'मिळाला' असे अहिराणी बोलीतील शब्द याही कवितेत अनेक आहेत. ते शोधा, त्यांचे अर्थ सांगा आणि आपल्या वहीत त्यांची नोंद करा.

***



# ८ माणुस माझे नाव

## बाबा आमटे

मुरलीधर देवीदास आमटे (जन्म: १९१४) कुष्टरोग्यांना नवजीवन देणारे थोर समाजसेवक. कुष्टरोग्यांचा 'पुरुषार्थ' जागवण्यासाठी त्यांनी 'आनंदवन' निर्माण केले. आता महारोग माणसाच्या आवाक्यात आला आहे; पण मनाला बधिर करणारा हा रोग त्यांना अस्वस्थ करतो. वरोराच्या आनंदवनात त्यांनी विकासाच्या अनेक योजना राबवल्या. 'ज्वाला आणि फुले', 'उज्ज्वल-उदयासाठी', 'करुणेचा कलाम' इत्यादी त्यांची पुस्तके.

ही कविता 'ज्वाला आणि फुले' (नवी आवृत्ती) या पुस्तकातून घेतली आहे. आधुनिक विज्ञानाने विकासाच्या अनेक दिशा दाखवल्या आहेत. मानवी मनात नव्या आकांक्षा निर्माण झाल्या आहेत. गरुडझेप घेणाऱ्या माणसाचे चित्र या कवितेत रेखाटले आहे.

माणुस माझे नाव, माणुस माझे नाव
दहा दिशांच्या रिंगणात या पुढेच माझी धाव.

बिंदुमात्र मी क्षुद्र खरोखर
परी जिंकले सातहि सागर
उंच गाठला गौरीशंकर
अग्नियान मम घेत चालले आकाशाचा ठाव.

मीच इथे ओसाडीवरती
नांगर धरुनि दुबळ्या हाती
कणकण ही जागवली माती
दुर्भिक्ष्याच्या छाताडावर हसत घातला घाव.

ही शेते अन् ही सुखसदने
घुमते यांतुन माझे गाणे
रोज आळवित नवे तराणे
मी दैन्याच्या विरुद्ध करतो क्षणक्षण नवा उठाव.

सुखेच माझी मला बोचती
साहसास मम सीमा नसती
नवीन क्षितिजे सदा खुणवती
दूर दाट निबिडात मांडला पुन्हा नवा मी डाव.

**शब्दार्थ व टिपा :**

**रिंगण**–वर्तुळ. **बिंदुमात्र**–थेंबाएवढा; अत्यंत लहान. **गौरीशंकर**–हिमालयाचे एक अत्यंत उंच शिखर. **अग्नियान**–रॉकेट – अंतराळातून विलक्षण गतीने जाणारे वाहन. **ओसाडी**–नापीक, पडीक जमीन. **दुर्भिक्ष्य**–दुष्काळ. **सुखसदन**–सुख देणारे घर. **तराणा**–एक गानप्रकार. **सीमा**–मर्यादा. **निबिड**–गडद; दाट.

**माती जागवणे**–जमिनीतून पीक काढणे.

**प्रश्न :**

१. माणसाने निसर्गावर कोणकोणत्या बाबतींत विजय मिळवला आहे?
२. माती जागवण्यासाठी माणूस काय काय करतो?
३. माणूस सतत कशाविरुद्ध उठाव करतो?
४. 'सुखेच माझी मला बोचती'—माणसाच्या या उद्गाराचे मर्म काय?
५. माणसाचे माणूसपण कशात आहे असे कवीला वाटते?
६. कवीने या कवितेला 'माणुस माझे नाव' हे शीर्षक का दिले असावे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. कणकण म्हणजे प्रत्येक कण. क्षणक्षण म्हणजे प्रत्येक क्षण. याच प्रकारे पुनरुक्ती दाखवणारे आणखी काही शब्द आहेत. उदाहरणार्थ, रात्ररात्र म्हणजे प्रत्येक रात्र. असे आणखी काही शब्द शोधून ते तुमच्या वहीत लिहून काढा.

***



# ९ झुबे लालसर

## इंदिरा

**इंदिरा नारायण संत** (जन्म: १९१४) कवयित्री, कथालेखिका. 'शेला', 'मृगजळ', 'गर्भरेशीम' इत्यादी कवितासंग्रह. 'शामली', 'कदली' हे कथासंग्रह. कौटुंबिक जीवनातील सुखदुःखे आणि निसर्गाबद्दल अपार प्रेम ही त्यांच्या कवितेची वैशिष्ट्ये आहेत.

ही कविता 'मेंदी' या संग्रहातून घेतली आहे. बालपणी निसर्गाच्या सहवासात जो आनंद मिळत असे तो आता प्रौढ वयात मिळत नाही, यामुळे उदास होणारे कवयित्रीचे मन या कवितेत व्यक्त झाले आहे.

निवडुंगाच्या शीर्ण फुलांचे
झुबे लालसर ल्यावे कानी;
जरा शिरावे पदर खोवुनी
करवंदीच्या जाळीमधुनी.

शीळ खोल ये तळरानातुन...
भणभण वारा चढणीवरचा;
गालापाशी झिळमिळ लाडिक;
स्वाद जिभेवर आंबट कच्चा.

नव्हती जाणिव आणि कुणाची,
नव्हते स्वप्नहि कुणी असावे;
डोंगरचढणीवरी एकटे
किती फिरावे... उभे रहावे.



पुन्हा कधि न का मिळायचे ते...
...ते माझेपण... अपले आपण;
झुरते तनमन त्याच्यासाठी,
उरते पदरी तीच आठवण

... निवडुंगाच्या लाल झुब्यांची,
टपोर हिरव्या करवंदांची.

**शब्दार्थ व टिपा :**

**शीर्ण**–विस्कळित; सुकलेले. **झुबा**–कानांतील झुमका; कानांतील दागिना; झुबका. **झिळमिळ**–कवयित्रीने हा शब्द गुदगुल्या करणाऱ्या वाऱ्याच्या स्पर्शासाठी योजला आहे.

**प्रश्न :**

१. बालपणच्या कोणत्या आठवणी कवयित्रीला येतात?
२. '... ते माझेपण... अपले आपण' या शब्दांतून तिला काय सुचवायचे आहे?
३. बालपणी डोंगर चढताना कवयित्री गुंग होत असे, हे तिने कोणत्या ओळींतून सुचवले आहे?
४. प्रौढ वयात तिचे मन कशासाठी झुरते?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. झुब्यांचे वर्णन हुबेहूब करण्यासाठी 'शीर्ण फुलांचे' आणि 'लालसर' हे शब्द योजले आहेत. 'वारा', 'स्वाद', 'करवंदें' यांचे वर्णन करताना कवयित्रीने कोणत्या शब्दांची योजना केली आहे?
२. अगदी लहान असतानाची कोणती विशेष आठवण अजूनही तुमच्या मनात कायम आहे, ती लिहा.
३. खूप भूक लागली तर आपण 'कडकडून भूक लागली' असे म्हणतो. तिखट, कडू, थंडी यांची तीव्रता आपण कोणत्या शब्दांनी व्यक्त करू याचा विचार करून, त्या त्या शब्दांचा वाक्यांत उपयोग करा.

* * *



## १० जन्मभूमी

### वासुदेवशास्त्री खरे

**वासुदेव वामनशास्त्री खरे** (जन्म १८५८; मृत्यू: १९२४) कवी, नाटककार आणि इतिहास संशोधक. 'समुद्र', 'यशवंतराय' ही त्यांची काव्ये. ' शिवसंभव', 'उग्रमंगल' इत्यादी नाटके. 'नाना फडणिसांचे चरित्र', 'ऐतिहासिक लेखसंग्रहा'चे बारा खंड इ. त्यांचे साहित्य आहे.

ही कविता 'फुटकळ चुटके' या काव्यसंग्रहातून घेतली आहे. जननीइतकेच जन्मभूमीबद्दलही माणसाला प्रेम वाटते. तेच या कवितेत व्यक्त झाले आहे.

पोटासाठी भटकत जरी दूर देशी फिरेन
मी राजाच्या सदनि अथवा घोर रानी शिरेन
नेवो नेते जड तनुस या दूर देशास दैव
राहे चित्ती प्रिय मम परी जन्मभूमी सदैव.

वेळोवेळी तुजसि बघुनी नेत्र संतुष्ट व्हावे
इच्छा होते परि तुजकडे चित्त हे मात्र धावे
यावे देहे, परि अससि तू शेकडो कोस दूर
आहे त्याच्या त्वरित गमना विघ्न हे दुर्निवार.

होतो लहान बहु खेळुन तृप्त झालो
अंकी तुझ्या, तिथुन थोरपणी निघालो
मातेसमीप असती परि थोर होती
तेव्हा पिले सहज सोडुनि तीस जाती.

लाटा आपटता उठे ध्वनि शिरे तो ज्यांचिया कंदरी
ऐसे पर्वत दुर्ग शोभति अति प्राचीन ज्यांच्या शिरी

'धो धो' शब्द करीत त्यांतुन झरे खाली कसे धावती!
पाणी तेच पिऊन बाग उठती शोभा तयांते किती!

आंबे पोफळि साग नारळि तटी दाटे तरूंचे बन
झोके घेति सुरम्य चंचळ जळी छाया तयांच्या घन
आकाशी जणु की विजा तळपती मासे जळी त्यांपरी
खाड्या त्या तव जन्मभूमि नयनी पाहीन केव्हातरी!

## शब्दार्थ व टिपा:

**घोर**–भयंकर. **जड तनू**–नाशवंत शरीर. **देहे**–देहाने; शरीराने. **दुर्निवार**–निवारण करण्यास कठीण. **अंक**–मांडी. **कंदर**–गुहा. **दुर्ग**–किल्ला. **पोफळ**–सुपारीचे झाड; न सोललेली सुपारी. **साग**–विशिष्ट जातीचे झाड. याचे लाकूड फार भक्कम असते. **घन**–गर्द; दाट.

## प्रश्न:

१. कवीची आपल्या जन्मभूमीबद्दलची ओढ कोणत्या ओळींतून व्यक्त झाली आहे?
२. कवी जन्मभूमीचे दर्शन का घेऊ शकत नाही?
३. आपल्या जन्मभूमीतल्या पर्वतांची शोभा वर्णन करताना कवीने कोणकोणत्या गोष्टींचा उल्लेख केला आहे?
४. इथल्या भूमीत कोणकोणते वृक्ष आहेत? त्यावरून ही भूमी कुठे आहे असे तुम्हांला वाटते?
५. कवितेच्या शेवटी कवी कोणती आशा बोलून दाखवतो?

## स्वाध्याय व उपक्रम:

१. सदन, संतुष्ट, समीप, विघ्न या शब्दांना समानार्थी शब्द शोधून ते तुमच्या वहीत लिहा.
२. 'सुरम्य' हा शब्द सु + रम्य असा तयार झाला आहे. इथे 'सु' म्हणजे विशेष किंवा अधिक. पुढील शब्द तसेच तयार झाले आहेत.
सुवाच्य, सुरक्षित. असे आणखी काही शब्द शोधा.
३. तुमच्या गावाचे वर्णन तुमच्या शब्दात लिहा.

* * *



# ११ अखंड

## जोतीराव फुले

**जोतीराव गोविंदराव फुले** (जन्मः १८२७, मृत्यूः १८९० ) समाजसुधारक आणि विचारवंत. लोकशिक्षणाचे कार्य आयुष्यभर केले. त्यांनी मुलांसाठी १८४८ मध्ये आणि अस्पृश्यांसाठी १८५१ मध्ये शाळा सुरू केली. त्यांच्या पत्नी सावित्रीबाई या शाळांत शिकवत. सत्यशोधक समाजाची १८७३ मध्ये जोतीरावांनी स्थापना केली. 'शेतकऱ्यांचा असूड', 'गुलामगिरी', 'सार्वजनिक सत्यधर्म' इत्यादी त्यांची पुस्तके. याशिवाय त्यांची काव्यरचना प्रसिद्ध आहे.

संतांच्या 'अभंगां' प्रमाणे जोतीबांनी 'अखंड' रचले. या 'अखंडां' मधून त्यांनी समता, बंधुभाव, सत्यनिष्ठा, उद्योगप्रियता यांचे महत्त्व सांगितले आहे.

हे अखंड 'महात्मा फुलेः समग्र वाङ्मय' या पुस्तकातून घेतले आहेत.

: १ :

एक सूर्य सर्वां प्रकाशास देतो।। उद्योगा लावीतो।। प्राणीमात्रा।। १।।
मानवासहीत प्राण्यांचे जीवन।। सर्वांचे पोषण।। तोच करी।। २।।
सर्वां सूख देई जनकाच्या परी।। नच धरी दूरी।। कोणी एका।। ३।।
मानवांचा धर्म एकच असावा।। सत्याने वर्तावा।। जोती म्हणे।। ४।।

: २ :

सत्याने वर्तावे ज्यास लोभ झाला।। मानवी शोभला।। तोच सुखी।। १।।
सर्व सुखी व्हावे मूळ आशा ज्याची।। हाव सुद्‌गुणाची।। तोच ज्ञानी।। २।।
आपसुखदुःख पराचे जाणतो।। त्यांच्याशी वर्ततो।। तोच धन्य।। ३।।
अशा मानवास सद्‌गुणी म्हणावा।। भावंडी गणावा।। जोती म्हणे।। ४।।

उद्योग जो करी दीनबंधूसाठी।। ममता ती पोटी।। मानवाच्या।। १।।
विद्या सर्वां देई सद्‌गुणांची हाव।। करी नित्य कीव।। अज्ञान्याची।। २।।
थकल्या भागल्या दीना साह्य करी।। उद्योगास सारी।। जपूनीया।। ३।।
त्याच्या उद्योगास नित्य यश देई।। जगा सुख देई।। जोती म्हणे।। ४।।



**शब्दार्थ व टिपा :**

**प्राणिमात्र**–सर्व प्राणी. **जनक**–जन्म देणारा – पिता. **वर्तावा**–आचरणात आणावा. **हाव**–उत्कट इच्छा. **आपसुखदुःख**–आपले सुखदुःख. **पराचे**–दुसऱ्याचे. **भावंडी गणावा**–तो आपला भाऊच आहे असे मानावे. **दीनबंधु**–गरीब, दुबळे बांधव. **सारी**–पार पाडतो.

**प्रश्न :**

१. सूर्य जगासाठी कोणकोणत्या गोष्टी करतो? त्यावरून आपण कोणता बोध घ्यावा?
२. खरा सुखी कोणास म्हणावे? त्याची कोणती वैशिष्ट्ये कवीने सांगितली आहेत?
३. सद्‌गुणी माणसाची कोणती लक्षणे जोतिबांना महत्त्वाची वाटतात?
४. या सर्व अखंडांमधून आदर्श माणसाचे कोणते गुणविशेष जोतिबांनी आपल्या मनावर ठसवले आहेत?

**स्वाध्याय व उपक्रम :**

'मानवांचा धर्म एकच असावा'–ही ओळ म्हणजे एक सुभाषितवजा वाक्य आहे. अशी आणखी काही सुंदर वाक्ये मिळवा. ती तुमच्या वहीत लिहून काढा.

* * *



# १२ सत्पुरुषलक्षणे

## वामनपंडित

**वामनपंडित** (जन्म: १६०८; मृत्यू: १६९५) प्राचीन मराठी कवितेत पंडितकवींची एक परंपरा होऊन गेली. वामनपंडित हे या परंपरेतले एक प्रमुख कवी. पौराणिक विषयांवरील त्यांची स्फुट काव्ये अनेक आहेत. 'यथार्थदीपिका' ही त्यांची गीतेवरील टीका प्रसिद्ध आहे.

भर्तृहरी नावाचा एक संस्कृत कवी होऊन गेला. त्याच्या 'नीतिशतक' या काव्याचा वामनपंडितांनी मराठी अनुवाद केला आहे.त्यातून काही निवडक श्लोक इथे घेतले आहेत.

विपत्काळीं धैर्य, प्रभुपणिं सहिष्णुत्व बरवें।
सभे पांडित्याचा प्रसर, समरीं शौर्य मिरवे।।
स्व-कीर्तीच्या ठायीं प्रचुर रति, विदया-व्यसन जें।
तयांचे हे स्वाभाविक गुण सहा सत्पुरुष जे।।

वानोत निंदोत सु-नीतिमंत।
चळो असो वा कमला गृहांत।।
हो मृत्यु आजीच घडो युगान्तीं।
सन्मार्ग टाकूनि भले न जाती।।

सु-नीति-पथ सेवणे मलिन कर्म मानेच ना।
घडो मरण नावडे खल-जनांप्रति प्रार्थना।।
विपत्ति-समयींहि जो प्रकटवीच ना दीनता।
भल्याविण असें असि-व्रत करूं शके कोणता।।

आली जरी कष्टदशा अपार।
न टाकिती धैर्य तथापि थोर।।

केला जरी पोत बळेंचि खालें।
ज्वाला तरी ते वरती उफाळे।।



**शब्दार्थ व टिपा :**

**विपत्काळ**–संकटकाळ. **प्रभुपण**–स्वामित्व; अधिकार. **सहिष्णुत्व**–सोशिकपणा. **सभे**–सभेमध्ये. **पांडित्य**–विद्वत्ता. **प्रसर**–दर्शन. **प्रचुर**–विपुल; अत्यंत. **रति**–आवड. **वानणे**–स्तुती करणे. **सु-नीतिमंत**–नीतिमान लोक. **कमला**–लक्ष्मी – ही श्रीमंतीची देवता. **युगान्त**–युगाचा शेवट; अत्यंत दीर्घ काळ. **मलिन कर्म**–वाईट काम. **खल-जन**–दुष्ट लोक. **पोत**–टेंभा; मशाल. **खाले**–खाली.

**असि-व्रत**–असि म्हणजे तरवार, तरवारीच्या धारेवर चालण्यासारखे; अवघड कार्य.

**प्रश्न :**

१. सत्पुरुषाचे मुख्य सहा गुण कोणते?
२. कोणत्याही परिस्थितीत सत्पुरुष सन्मार्ग सोडत नाहीत, हे कोणत्या शब्दांत कवीने सांगितले आहे?
३. कोणते असि-व्रत भले लोक आचरतात?
४. मशाल जरी खाली वळवली तरी जाळ वरच जातो. ह्या उदाहरणाने सत्पुरुषांचा कोणता गुण कवीने सांगितला आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. सत्पुरुष हा शब्द सत् + पुरुष आणि सन्मार्ग हा शब्द सत् + मार्ग असा तयार झाला आहे. याच प्रकारे तयार झालेले आणखी काही शब्द सांगा.
२. ता, त्व, पण, पणा हे प्रत्यय जोडून नामे तयार करता येतात. उदाहरणार्थ - दीन-दीनता. अशी काही नामे सांगा.

* * *



# १३ संतवाणी

संतकवींचे भक्तिपर व उपदेशपर काव्य मराठी माणसाने पिढ्यानुपिढ्या जतन करून ठेवले आहे. इथे ज्ञानेश्वर, चोखामेळा, तुकाराम व बहिणाबाई यांच्या काही रचना दिल्या आहेत.

**ज्ञानेश्वर** (जन्म: १२७५; समाधी:१२९६) संतकवी आणि महाराष्ट्रातील भागवत धर्माचा पाया घालणारे तत्त्वज्ञ. 'ज्ञानेश्वरी', 'अमृतानुभव', 'चांगदेव पासष्टी' इत्यादी ग्रंथ.

पुढील ओव्या त्यांच्या 'ज्ञानेश्वरी' या ग्रंथातून घेतल्या आहेत. संत-महात्म्यांजवळ आपपर भाव नसतो; त्यांचे सर्वांवर सारखेच प्रेम असते हे त्यांनी पुढील ओव्यांत सांगितले आहे.

जो सर्व भूतांच्या ठायीं। द्वेषातें नेणेंचि कहीं।
आपपरु नाहीं। चैतन्या जैसा।। १।।

उत्तमातें धरिजे। अधमातें अव्हेरिजे।
हें कांहींच नेणिजे। वसुधा जेवीं।। २।।

गाईची तृषा हरूं। कां व्याघ्रा विष होऊनि मारूं।
ऐसें नेणेंचि गा करूं। तोय जैसें।। ३।।

तैसी आघवियांची भूतमात्रीं। एकपणें जया मैत्री।
कृपेसीं धात्री। आपणपां जो।। ४।।

आणि मी तू हे भाष नेणे। माझें कांहींचि न म्हणे।
सुखदुःख जाणणें। नाहीं जया।। ५।।

– ज्ञानेश्वर

**चोखामेळा** (जन्म-सनः अनिश्चित; निर्याणः इ. स. १३३८) तेराव्या शतकातील प्रसिद्ध संत. नामदेवादी संतांप्रमाणे त्यांनीही अभंगरचना केली आहे.

साधूपणाचे सोंग मिरवणाऱ्या भोंदूचा कडक शब्दांत त्यांनी समाचार कसा घेतला आहे, ते या अभंगात वाचा.

माकडाचे परी हालविती मान।
दावी थोरपण जगामध्यें।। १।।

स्वहिता मुकले स्वहिता मुकले।
बळें झांकी डोळे नाक धरी।। २।।

माळा आणि मुद्रा दाविताती सोंग।
डोलविती अंग रंग नाहीं।। ३।।

पोटाचा पोसणा विटंबना करी।
भीक दारोदारीं मागतसे।। ४।।

चोखा म्हणे जगामध्यें भोंदू।
तया कोण साधु म्हणे देवा।। ५।।

–चोखामेळा

**तुकाराम** (जन्मः १६०८; निर्याणः १६५०.) संतकवी. त्यांचे अभंग आजही खेड्यापाड्यांतील लोकांच्या जिभेवर आहेत.

कोणत्या गुणांमुळे संतांना वंदन करावेसे वाटते त्याचे वर्णन या अभंगात केले आहे.

धन्य तेचि प्राणी क्षमा ज्यांचे अंगीं। न भंगे प्रसंगीं धैर्यबळ
न म्हणे कोणासी उत्तम वाईट। महत्त्व वरिष्ठ नसे जेथें
अंतरीं सबाह्य सारिखे निर्मळ। हृदय कोमळ गंगारूप
तुका म्हणे काया कुरवंडीं तयां। ठेवीन मी पायां मस्तक हें

– तुकाराम

**बहिणाबाई** (जन्म:१६२८ ; निर्याण:१७००) संत तुकारामांच्या शिष्या. संत कसे ओळखावे यासंबंधीच्या काही कसोट्या त्यांनी या अभंगात सांगितल्या आहेत.

आपुलिया दुःखें जैसे होती क्लेश । दुजिया चित्तास तेंचि परी ॥१॥
ऐसें जे जाणती आपुले मानसीं । संत निश्चयेंसी वोळखावे ॥२॥
परविया सुखें सुख मानी मनीं । देखें वनीं जनीं जनार्दन ॥३॥
कापुराचें जैसे अंतर्बाह्य शुद्ध । किंवा तें प्रसिद्ध रत्न जैसें ॥४॥
तैसें ज्याचें चित्त सारिखें सर्वदां । संत तयां वदा सर्वभावें ॥५॥

– बहिणाबाई



**शब्दार्थ व टिपा :**

**चैतन्य**–परमेश्वर. **धरिजे**–स्वीकार करते. **अव्हेरिजे**–त्याग करणे; दूर लोटणे. **वसुधा**–पृथ्वी. **तोय**–पाणी. **आघवियांचि**–सर्व. **एकपणे**–सर्व प्राणिमात्र एक आहेत या भावनेने. **धात्री**–आधार. **मी हे भाष नेणे**–'मी' ही भाषा ज्याला माहीत नाही, ज्याचा अहंकार नष्ट झाला आहे. **बळें**–ओढूनताणून; मुद्दाम. **मुद्रा**–शिक्का; ठसा. **पोटाचा पोसणा**–केवळ पोट भरण्यासाठी धडपडणारा; पोटभरू. **काया**–शरीर.

**कुरवंडी करणे**–प्राण अर्पण करणे.

* * *

